
नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)



महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com



# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# यंत्रसामुग्रीच्या अधिकाधिक कारखानदारांचीं

# विश्वसनीय

**किर्लोस्कर**

## डिझेल एंजिनें



टाइप एव्ही १ आणि जेव्ही १
५ ते ७.५ हॉर्स पॉवर



टाइप एव्ही २ आणि जेव्ही १
१० ते १५ हॉर्स पॉवर



टाइप बी ४ ४० ते ४८ हॉर्स पॉवर



टाइप आर ए, हवेनें थंड होणारी
१७ ते ६४ हॉर्स पॉवर.





देशांत तयार होणाऱ्या, पुढील कितीतरी प्रकारच्या यंत्रसामुग्रीच्या बाबतींत हमखास शक्ति पुरवठ्याचें साधन म्हणून किर्लोस्कर एंजिनें विश्वासास पात्र ठरलीं आहेत – कॉंक्रीट मिक्सर्स, कॉम्प्रेसर्स, टार मिक्सर्स, रोड रोलर्स, पंप, क्रशर्स, जनरेटर्स इत्यादि.

सर्वश्रेष्ठ दर्जा आणि कितीहि खडतर परिस्थितींत कोणत्याहि कटकटींवांचून उत्तम कामगिरी या त्यांच्या गुणांमुळें यंत्रसामुग्रीचे अधिकाधिक कारखानदार ही एंजिनंच प्रथम पसंत करतात.

## किर्लोस्कर ऑइल एंजिन्स लिमिटेड

रजिस्टर्ड ऑफिस : एल्फिन्स्टन रोड, पुणे-१ (भारत)

अनुक्रमणिका

वर्ष २१ वें ● एप्रिल १९६५ ● मूल्य १ रु.




## श्रे य ना मा व ली—

● **कादंबरी–देवाला डोळे असतात**–घनदाट जंगलांनी भरलेल्या निर्जन बेटावर दोन माणसें–एक पुरुष आणि एक स्त्री–एकमेकांना भेटतात. उध्वस्त विश्वाच्या पार्श्वभूमीवर एक नवी कथा आकार घेऊं लागते–लेखक [**चार्लस् शॉ–अनु.–प्र. श्री. नेरुरकर**]

● **कथा**–तोल सुटला तरी सांवरायला हवेंच [**आवाहन– सौ. शकुंतला गोगटे**] ती पसंत पडली. (कागदोपत्रीं) भाग्य उजळल्यासारखें वाटलें. पण–[**कोंडी–सा. विजया काळे**] गाडी चुकली म्हणून मी योग्य "स्थळी" पोंहचलो [**शेवटची गाडी–गो. शं. पतके**]

● **एकांकिका**–आव्हान देऊन राजा जिंकला. [**मात–प्रा. प्रभाकर पाटील**]

● **ललित निबंध**–निर्जीव (भासणाऱ्या) वास्तु सजीव होऊन बोलूं लागतात [**खुणा–प्रा. गजमल माळी**]

● **आम्हीं असें लिहितो**–सृजनशील लेखनाच्या प्रेरणा समजून घेण्यासाठी वाचा [**वि. वा. शिरवाडकर–(कुसुमाग्रज) मुलाखत–प्रभाकर अत्रे**]

याशिवाय दीपमाला, सन्मानपुष्पें, चांदण्यांचें जग, व्यंगचित्रें वगैरे भरपूर चित्ताकर्षक साहित्य.

**दलाल आर्ट स्टुडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

टे. नं. ७७७६५

Gram : Dalalrt

* संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक श्री. **दीनानाथ दलाल,** दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें ही चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं.

Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

Published at : Dalal Art Studio, 40–42, Kennedy Bridge, Bombay–4.



अनुक्रमणिका




**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४,

टेलिफोन : ७७७६५ ★ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमी-जास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यत: कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ** दलाल यांनीं स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टूडिओ, ४२ केनडी ब्रीज, मंबई ४ येथें **प्रसिद्ध** केलें.

# नवें जुनें आणि चांगलें

**साहित्य** हा मोठा 'सेन्सेशनल' विषय आहे. साहित्य निर्मितीची प्रक्रिया मोठी शांत, निर्मात्या पुरतीच मर्यादित असली तरी निर्मितीनंतर तो चेंडू वाचक–प्रेक्षकांच्या (नाटक) एकदां कां हातीं गेला कीं, मग खेळाला जो रंग चढतो, त्याला तोड नाहीं. शांतपणें निर्मितीही होते आहे आणि शांतपणें ती वाचली–आस्वादली जात आहे असें दृश्य येथें दिसणें नाहीं. ह्या चेंडू-फेंकीचें साहित्य प्रांतीं नांव आहे "टीका" ! हा मोठा गंमतीदार खेळ आहे. चेंडूचे गुणधर्म समजावून सांगण्याची त्या खेळाची प्रतिज्ञा आहे. पण अखेर ह्या खेळाचेंही स्वरूप 'वैयक्तिक' असल्याने त्या चेंडूचे गुणधर्म सांगतांना "वैयक्तिक" भाग त्यांत येणें अपरिहार्य नव्हे काय ? कधीं कधीं चेंडूचें वर्णन इतकें रंगात येते कीं, चेंडूच आपले गुणधर्म ते हेच काय अशा संभ्रमांत पडतो. कधीं कधीं 'तो मी नव्हेच' म्हणून इन्कारही करतो. पुष्कळदां असलेलें दडवणें (क्वचित प्रसंगीं कांहीं न समजल्यामुळेंही) आणि नसलेलें चिकटविणें हाही प्रकार घडतो. आणि मग मूळ चेंडूऐवजी ह्या टीका नामक भाष्यांचीच झटापट सुरू होते.

तूर्त साहित्य प्रांतीं निर्मितीपेक्षां ह्या टीकानामक भाष्यांची चलती झाल्यासारखें भासतें आहे. अश्लील-श्लील हा एक इथें नगरीचा कधींही न संपणारा व मधुनमधुन "सेन्सेशन" उत्पन्न करणारा खेळ ! परवां पुण्याला त्याचा 'लेटेस्ट' प्रयोग झाला. गाजलेल्या तीन गोष्टी ! आचार्य अत्रे-फडके यांच्या साक्षी आणि न्या. मू. गवांदे ह्यांचें निकालपत्र ! कुणीं जिंको–कुणीं हरो–प्रेक्षक आपला पैसा वसूल झाला कीं नाहीं तें पाहणार ! परवां एका प्राध्यापकानें बाईचा 'बुरखा' घेऊन एका 'सभ्य' मासिकाची टोपी उडविली. प्रेक्षक खूष ! कुणीं-तरी कुणाची तरी टिंगल–टवाळी करतो. लोक खूष ! पण हें समाधान खरें आहे काय ? कलात्मक आनंद देणारें आहे काय? नामवंतांच्या (नव्या-जुन्या–केवळ वयपरत्वें) कलाकृति रंगमंचावर येतात. पांढऱ्या पडद्यावर झळकतात. मासिक-पुस्तकांच्या कोनाड्यांत बसतात. पण आज त्या कलात्मक समाधान देऊं शकतात काय ? नव्या जुन्याचा वाद घातल्यानें कलागुण सिद्ध होत नाहींत. 'नाती गोतीं' लक्षांत घेऊन दिली गेलेली कलाबाह्य प्रशस्तीपत्रें फारशीं उपयोगीही पडत नाहींत. (हें वारंवार सिद्ध झाले असल्यानंतरही अशीं प्रशस्तीपत्रें इये प्रांतीं वारंवार दिलीं जातच असतात) इथें कधीं वाचक 'क्षुद्र प्राणी' म्हणूनही संबोधला जातो. तर कधीं तें परम दैवत (मायबाप) समजलें जातें. पण अखेर त्याचा सृजनाला फायदा काय? नवें म्हटल्यानें आजचें नवें 'चांगलें' ठरतेंच असें नाहीं. व जुनें म्हटल्यानें केशवसुत, तांबे, गडकरी, खाडिलकर, किर्लोस्कर, देवल जुनें टाकाऊ ठरत नाहींत. वाचकाला परब्रह्म म्हणून तो आजचे नवें 'चांगलेंच' आहे असें म्हणणार नाहीं. त्याला क्षुद्र म्हणूनही आजचें क्षुद्र जें आहे तें सुवर्ण ठरेलच असें नाहीं. अशी भलावण कलेच्या क्षेत्रांत फारशी उपयोगी पडत नाहीं असाच काळाचा हवाला आहे.

भरमसाट भलावण केलेलीं नाटकें सटासट आपटताहेत. तिथें लेखकाचें (व लेखन विषयाचें) मोठें नांव वांचवूं शकत नाहीं. नटसंचाची व कंपनीची पुण्याई त्यांचा पराभव रोखूं शकत नाहींत. राजांची पुण्याई राज्य वांचवूं शकली असली तरी राजांचा रुपेरी अवतार सांवरूं शकली नाहीं. नवे प्रयोग केवळ 'नवे' आहेत म्हणून स्थिरावूं शकत नाहींत. त्यांच्या 'खुर्च्या' कधींच काढून घेतल्या जातात. अखेर नवें जुनें वगैरे लेबलें कांहीं कलाकृतीच्या अंगभूत गुणावगुणांत फरक करूं शकत नाहींत. हा वाद नेहमींच निरर्थक ठरत आलेला आहे. आणि तरीही तो वारंवार खेळला जातो आहे. ह्या वादांत गुदमरते आहे खरी कला – कला-निर्मिती ! मूळ खेळ दुर्लक्षिला जातो आहे कीं काय अशी भीति वाटूं लागली आहे. कारण साहित्य टीकेपेक्षां साहित्य निर्मितीला नेहमींच महत्व राहील. मूळ वस्तु असेल तर त्याचें भाष्य जन्म पावूं शकेल. टिंगल टवाळीपेक्षां सृजनाचा ध्यास अधिक महत्वाचा आहे. कलात्मक आनंद त्यांतूनच निर्माण होईल. निर्मितीतल्या 'कसा'ला महत्व दिलें गेलें तरच त्या आनंदाची निर्मिती होऊं शकेल. आज तुमची–आमची भूक ह्या सृजनाची आहे. असली पाहिजे. कारण शिमग्याचा-टोपी उडविण्याचा खेळ कांहीं काळ बरा वाटला तरी त्यांतून सच्चा, कलात्मक, दिव्य आनंद लाभणार नाहीं. कलेचें पाऊल पुढें पडणार नाहीं. चांगल्या निर्मितीची जागा टोप्या उडवणारी, कलाबाह्य प्रशस्तीपत्रें देणारीं, गुणांपेक्षां 'नात्यां'चा विचार करणारीं टीका भरून काढूं शकणार नाहीं. चांगली कलानिर्मिती हीच तें कार्य करूं शकेल. आणि नव्या जुन्याच्या कृत्रिम वादावादींत तिचेंच 'सोनें' उजळून निघेल.

––संपादक



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



ती शेवटची गाडी चुकली म्हणून ही गाडी सांपडली—
—चांगल्या ठिकाणी घेऊन जाणारी, सुखद प्रवास घडविणारी !

—गो. शं. पतके




**त्या** दिवशीं दिनेशला खूप आनंद झाला होता. त्याची एक मोठी चिंता दूर झाली होती. आयुर्विमा कचेरींतील मुंबईच्या एका शाखेंत त्याची कोल्हापूरहून बदली झाल्यापासून मुंबईंत राहण्याची मोठी समस्या त्याला सोडवावयाची होती. त्याचे मामा चौगुले आणि त्यांची सुशिल पत्नी रेणुका यांना आपण किती दिवस त्रास द्यायचा या विचारानें तो खूपच ग्रस्त झाला होता. त्यांतून एक दिवशीं अचानक त्याची नि रिटाची इरॉस सिनेमागृहांत गांठ पडली त्यामुळें एक नवीनच भानगड उपस्थित झाली. रिटा कॉलेजमध्यें त्याच्यापेक्षां दोन वर्षांनीं ज्युनियर होती. पण वार्षिक समारंभाच्या वेळीं एका नाटकांत तिनें त्याच्याबरोबर नायिकेची भूमिका केल्यापासून त्यांच्यांत एक नवें स्नेहाचे नाते निर्माण झाले होते. रिटानें आपल्या गोड आणि लाघवी स्वभावानें त्याच्या हृदयाच्या नाजुक तारा छेडल्या होत्या. त्या छोटयाशा सहवासानें त्या दोघांमध्यें स्निग्ध स्नेहाचे मधुर नाते निर्माण झाले होते. पण कॉलेजचे शिक्षण संपतांच रमेशला पुण्याला विमा कंपनींत एक बड्या पगाराची नोकरी मिळाली. त्या स्निग्ध संबंधाचे व्हायला पाहिजे होते तसें गाढ मैत्रीचें रुपांतर झाले नाहीं. त्याची आणि रिटाची ताटातूट झाली. कोल्हापूर दूर राहिले. कॉलेजमधील ते रमणीय दिवस म्हणजे नुसत्याच गोड स्मृति ठरल्या. कधी कधी रमेशला रिटाची आठवण व्हावयाची. पण त्यानें तिच्याशीं पत्रव्यवहार चालू ठेवला नव्हता. कोल्हापूर सोडून तो पुण्याला नोकरीसाठीं आला त्यावेळीं रिटानें नाटच-सृष्टींत थोडी आणखी प्रगति केल्याचे त्यानें ऐकले होते. एका हौशी नाटच संस्थेच्या संगीत नाटकांत चांगली भूमिका वठवून आणि चार गोड गाणी गाऊन तिनें एक नवाच विक्रम केला होता. . . .

आणि त्यानंतर रिटा त्याला अचानक इरॉस सिनेमांत भेटली होती. आपल्या मैत्रिणीबरोबर ती मुंबईला आली होती. बी. ए. च्या परीक्षेला नापास झाल्यामुळें तिनें शिक्षणाला राम राम ठोकला होता. संगीतांत प्रगति करून तिनें नाटचसृष्टींत चांगलाच जम बसवावयास सुरुवात केली होती. "अमृत सिद्धि" या नाटकांतील तिच्या भूमिकेवर एक जुने सरदार घराण्यांतील हौशी जसवंतराव खूश झाले होते व नाटच शिक्षणाकरतां एखादी शिष्यवृत्ति मिळवून देण्याच्या निमित्तानें त्यांनीं तिला मुंबईला पाचारण केले होते. रमेशची नि तिची इरॉस-मध्यें गांठ पडली त्यावेळीं ती जसवंतरावच्या बहिणीबरोबर सिनेमाला आली होती व तिचा मुक्काम जसवंतराव यांच्या मरीन ड्राईव्हवरील एका फ्लॅटमध्यें त्यावेळीं होता.

इरॉस सिनेमांतील त्या भेटीनंतर तिची आणि त्याची परत गांठ पडली होती. तिचा मुंबईमधील मुक्काम लांबला होता नि ती गोष्ट त्याच्या पथ्यावरच पडणारी होती. कारण तिची नि त्याची आतां रोज न चुकतां गांठ पडूं लागली. ऑफीसला बुट्टी मारून सिनेमाला जाणें किंवा भटकणें असा उद्योग त्यानें आरंभला. आणि अनेक वर्षांचे त्याचे गडप झालेले तारुण्यसुलभ आणि स्वच्छंदी असे प्रेमाचे स्वप्न साकार होऊं लागले.

पुष्कळ दिवस वाट पाहिल्यानंतर शेवटी एकदाचा विमा कॉर्पो-रेशनमधील नोकरवर्गासाठीं बांधलेल्या एका नव्या इमारतीमध्यें त्याला एक फ्लॅट मिळाला होता आणि सहा महिन्यांत दोनाचे चार हात न झाले तर ती जागा त्याला गमवावी लागली असती अशी प्रेमळ धमकी त्याच्या ब्रँच मॅनेजरनें त्याला दिली होती.

रिटाला बरोबर घेऊन जाण्यासाठीं त्यानें जसवंतरावच्या घरीं कचेरी सुटतांच मुद्दाम हेलपाटा मारला. पण रिटाची नि त्याची भेट होऊं शकली नाहीं. जसवंतरावबरोबर कोठल्यातरी समारंभाला ती गेल्याचे त्याला समजले. त्यामुळें त्याचे मन थोडे खट्टूच झालें.

आज त्याला घरीं जाण्याची देखील घाई नव्हती. कारण मामा-मामीची जोडी एका मित्राच्या मुलीच्या लग्नाकरतां पुण्याला गेली होती व कोठें तरी हॉटेलमध्यें जाऊन जेवून घेऊन त्याला मामाच्या घरीं गिरगांवांत रखडत जाणें भाग होते.

मरीन लाइन्स स्टेशनवरील पूल ओलांडून तो समुद्राच्या बाजूनें वाटचाल करूं लागला. त्यावेळीं आकाश ढगांनीं भरले होते व पावसाचे थेंब मधून मधून जोरानें वर्षाव करीत होते. पावसाळी हवेमुळें समुद्राच्या काठीं गर्दी अशी नव्हतीच. रेनकोट चढवून पावसाच्या झोताचा मार चुकवीत तो कसाबसा चौपाटीपर्यंत पोहोंचला. तेथील एका नव्या कोऱ्या हॉटेलमध्यें गुजराती पद्धतीचे जेवण त्यानें उरकलें. या वेळीं त्याला खूप भूक लागली होती. आठच दिवसांपूर्वीं रिटाला

घेऊन तो ह्याच हॉटेलमध्यें आला होता नि तिलादेखील हे हॉटेल खूपच आवडले होते. त्या सुखद आठवणीनें दिनेश किंचित्सा व्याकूळ झाला.

पावसाची रिप रिप बंद झाली होती. तो झप झप चालतच ऑपेरा-हाऊसजवळील एका मोठ्या इमारतीमधील आपल्या मामांच्या फ्लॅटवर पोंचला. घड्याळांत आठ वाजून गेले होते. त्यानें आपल्या-जवळील किल्लीनें घराचे कुलूप काढले. दार उघडतांच मामीची लाडकी मांजरी "मिठी" त्याच्या पायाला बिलगली व म्यॉंव म्यॉंव करीत त्याला तिनें गांगरून सोडले. मग त्याला आठवले की रात्रीं तिला दूध पिण्यासाठीं द्यावयाचे असे मामीनें त्याला तो ऑफिस-मध्यें जाण्यापूर्वी सकाळीं बजावून सांगितले होते. त्यानें लगेच स्वयं-पाक घरांत जाऊन दूधाच्या पातेलींतील दूध एका बशींत ओतून मिठीच्या पुढ्यांत ठेवले. मिठीची म्यॉंव म्यॉंव थांबली. तरी त्याला कांही सूचेना. खोलीचे दार उघडून तो गॅलरींत गेला. रस्त्यावरील गर्दीकडे पाहून त्याचे मन रिझेना. आपणाला कांहींच पूर्वसूचना न देतां रिटा त्या जसवंतरावबरोबर एकदम कशी नि कुठं गडप झाली ह्याचा त्याला अचंबा वाटत होता. त्यामुळें तिला घेऊन सांताक्रूझला जायचा आणि आपल्या वांट्याला आलेली जागा तिला दाखवि-ण्याचा त्याचा बेत तसाच सोडून द्यावा लागला होता.

गॅलरींतून परत तो आंतील खोलींत गेला. मामाचा फ्लॅट तसा अगदी बेताचाच होता. एक छोटे स्वयंपाकघर, एक झोपायची खोली व पुढील बैठकीची खोली एवढीच ती जागा होती. गॅलरी मात्र स्वतंत्र होती व गॅलरीचे रुपांतरच खोलींत करून मामानें आपल्या भाच्याची तात्पुरती सोय केली होती. एक छोटे टेबल-खुर्ची आणि एक कॉट मावेल एवढी मोठी गॅलरी होती. आणि ती त्याला पुरेशी होती. त्यानें बिछाना तयार करून त्यावर अंग टाकले. टेबलावर कसल्या तरी एका सचित्र इंग्रजी मासिकचा अंक पडला होता. तो त्यानें किंचित्सा चाळला. त्यांत शिष्यवृत्ती मिळालेल्याच्या यादींत रिटाचे नांव होतें. तें वाचून त्याला आश्चर्याचा धक्का बसला. तेवढ्यांत दूध संपवून मिठी त्याला परत येऊन बिलगली. ती पटकन् उडी मारून त्याच्या अंगाला चिकटून बसली.

"मिठे बेटे ! तूं कशाला एवढी माझी काळजी वाहतेस... ती भेटली असती तर कित्ती मजा आली असती. पण तो बोका जसवंतराव आहे नां. त्यानं सारा घात केला–" तो तिला उद्देशून पुटपुटला.

"म्यॉंव ! म्यॉंव !" करून तिनें आपली सहानुभूति व्यक्त केली.

एवढ्यांत दारावरची घंटा वाजली. त्यानें धांवतच उठून दार उघडले.

एक तरुण मुलगी बाहेर उभी होती. तिचे अंग पूर्ण ओलेंचिंब झाले होते. केंस विस्कटलेले होते. तिला पहातांच त्याला किंचित् आश्चर्याचा धक्काच बसला. त्यानें तिला ओळखलेच "कोण...वासंती? आणि कोल्हापूरहून इकड कुठं अचानक ?" त्यानें चौकशी केली.





अनुक्रमणिका

तिच्या मागें सामान घेऊन एक गडी होता.

"अरे आंत आण ते सामान" सामान त्याच्याकडून उतरून घेत तो आंत आला.

"केवढी भिजली आहेस. आधी कपडे बदल. मी आंत चहा करतो. मामा-मामी आजच पुण्याला गेली आहेत–" त्यानें खुलासा केला.

ती थोडी बुचकळली.

"मला मावशीचे घर सापडलं नाहीं म्हणून मी इथे आले. गेल्या वर्षी मी इकडे आले होते व हा पत्ता माझ्या लक्षांत होता." वासंती म्हणाली.

"मावशी म्हणजे ती मामीची मैत्रिण लीलाताईच ना. . .हं..ती नुकतीच गोरेगांवला राहयला गेली. तिच्या यजमानानीं आतां तेथें स्वतःचा फ्लॅट घेतला आहे एक सोसायटीमध्यें–" त्यानें तिला माहिती दिली.

तो चहाच्या तयारीला लागला. वासंतीच्या अचानक आगमनानें तो जरा उल्हसितच झाला. तसं म्हटलं तर वासंती म्हणजे कोल्हापूरचे त्यांचे शेजारी सिरनामे यांची एकुलती एक मुलगी. मोठी विलंदर होती. अतिशय व्रात्य आणि खोडकर. कॉलेजांत जाईपर्यंत तो तिच्याशीं अगदी हमरी तुमरीवर येऊन खेळायचा. पण कॉलेजांत त्याचे मन जसे रमले तसे वासंतीचे आणि त्याचे फारसे कधी जमले नाहीं. तिची नि त्याची मधून मधून गांठ पडायची इतकेच. तो पुण्याला गेला व वासंतीची व तिची चार वर्षांत गांठ पडली नाहीं.

पण आज अर्धवट पाण्यानें भिजलेली बांधेसूद, गौरवर्णीय व चांगली उंच शेलटी बांध्याची विशीच्या आंतील तरुणीच्या रुपांतील तिचे व्यक्तिमत्व पाहून तो खूपच चाट पडला. तो स्वयंपाक घरांत चहाचे आधण उतरीत असतांनाच आपले पातळ बदलून वासंती त्याच्याजवळ आली.

"छान ! निदान चहा तरी तुला करतां येतोय." ती म्हणाली.

"कां ? तुला भांडायची लहर आली काय लहानपणची आठवण म्हणून–" त्यानें विचारले.

"तसं नाहीं रे ! आम्ही खेडेगांवची माणसं ! मागासलेली. आम्हाला तुमच्या आवडीचा चहा बनविणं कसं जमणार ? चहा निराळा, साखर निराळी, दूध निराळे ! हें सारे शहरांतले थाट ! आमचा चहा म्हणजे या साऱ्याचे एक गरम सरवत... नव्हे बासुंदीच खरं ना ?" तिनें चेष्टेच्या स्वरांत उद्‌गार काढले.

"आधी चहा पी. मग काय तें पाहूं–" तो ओशाळत होता.

"आतां पहायचं कांहीं नाही. गोरेगांवला घेऊन चल मावशीकडे–" ती म्हणाली.

त्यानें घड्याळाकडे पाहिलें. रात्रीचे नऊ वाजून गेले होते.

"गोरेगांव येथून खूप लांब आहे. बारा वाजतील रात्रीचे पोचायला–" तो म्हणाला.

"पण तें कांहीं असलें तरी मला तिच्याकडे गेलेच पाहिजे–" तिनें थोडा हट्टच धरला.

"हें बघ.... तू आंतील खोलींत जाऊन स्वस्थ झोंप. मी इथं बाहेर गॅलरींत सोबतीला आहेच. उद्यां सकाळीं उठून तुझ्या मावशीच्या स्वाधीन मी तुला करतो म्हणजे झालें ना ?" त्यानें आपला विचार मांडला.

"मावशीला तें नाहीं आवडणार ! ती आहे जुन्या वळणाची.. त्यांतून तुझे मामा नि मामी देखील इथं नाहींत..... अशा स्थितींत तूं आणि मी एक रात्र जर इथं काढली तर.... छे ! छे ! कल्पना देखील सहन होणार नाहीं त्यांना. नसतं संकट नको–" ती म्हणाली.

"ठीक आहे !–" असें म्हणून त्यानें कपडे चढवले.

दाराला कुलूप लावून दोघेही बाहेर पडलीं.

ग्रँट रोड स्टेशनमध्यें फर्स्ट क्लासमध्यें डबा जवळ जवळ रिकामाच होता. एका कोपऱ्यांत त्यांना निवांत जागा मिळाली. चारच दिवसापूर्वी रिटाला घेऊन तो असाच जुहूला गेला होता. आणि त्या वेळीं त्यानें आपले हृदय तिला उघडें करून दाखविले होते. पण ती मात्र नुसती हंसत होती, चेष्टा करीत होती नि खेळवत होती ! त्यामुळें तिच्याकडून संमति मिळविण्याचा प्रश्न तसा अर्धवटच राहिला होता. आणि शिष्यवृत्ति मिळाल्याची गोष्ट तिनें माझ्यापासून लपवून ठेवली होती.

"एवढी भारी तिकीटं कशाला काढलीस ? तिसऱ्या वर्गांत कांहीं एवढी गर्दी नव्हती–" तिनें त्याला त्याच्या तंद्रींतून जागे केले.

"अगं ! एवढी कशी खुळी ग तूं... आपणाला चांगलं मोकळेपणानं बोलतां यावं म्हणून मी फर्स्ट क्लासची तिकिटं काढली ! आणि आतां सांग मला तूं की अशी अचानक मुंबईला कशी आलीस आणि एकटीच आलीस ?"– तो.

"त्याचं असं झालं की माझ्या बरोबर बाबाच येणार होते. पण त्यांचं कोर्टाचं कांहीं काम निघालं आणि मग त्यांनीं मला सोबत पाहून पुण्याला जाणाऱ्या एस. टी. ला बसवून दिलं. पण पुण्याहून मात्र मी एकटीच आले इथपर्यंत –" ती

"अस्सं ! पण लीलाताईकडे एवढं काय काम आहे बुवा ?" तो.

"माझ्यासाठीं बाबा आतां स्थळं पाहताहेत. लीलाताईचा एक आतेभाऊ असतो विमान दलांत. त्याला दाखविणार आहेत मला–" एवढे सांगून ती गंभीर [झाली.]

"म्हणजे तुझ्या स्वतःच्या कांहीं आवडी निवडी नाहीं वाटतें ? अजून जुन्या जमान्याप्रमाणें मुली दाखविण्याचा हा कार्यक्रम चालूं आहे तर–" तो कांहींसा स्वगतच म्हणाला.

"आम्ही गांवढळ माणसं. तुमच्या सारखं आम्ही थोडेच शिकून शहाणे झालोंत ! एक शेती तरी करायची नाहीं तर मर्दुमकी...आणि घाटग्यांच्या शूर घराण्यांतील सरदारकी सोडून तूं या कारकुनांच्या बाजारांत कसा शिरलास ? पहावं तें आश्चर्यच–" तिनें सफाईदारपणें उत्तर दिलें.

"कसली सरदारकी आणि इनामदारकी घेऊन बसलीस !





बावांनीं करून ठेवलेले कर्जाचे डोंगर उतरण्याकरितां तर तावडतोब मी नोकरी पत्करली–" तो म्हणाला.

"मग आतां आडलं कुठं ? नोकरी तर तुला चांगली मिळाली. आतां फक्कडशी वहिनी आण घरीं म्हणजे झाले... अरे खरंच् तुझी ती फाकडी कुठं असती हल्लीं ? अरे फाकडी म्हणजे तुझ्याबरोबर नाटकांत काम करणारी ती. . . . तिनें म्हणे हल्लीं नवीनच नांव धारण केले आहे, सुहासिनी—" तिनें पृच्छा केली.

"ती होय ?... ती आहे की इथंच... भेटते मला ती... खूप गोड गाते आणि नाटकांत देखील छान काम करते–" तो.

"तुला खूप आवडते ती ?"– ती

"हूं !" तो

"तिच्यावर तुझा जीव आहे ?–" ती

"अगदीं तसंच कांहीं नाहीं... पण तूं जर चार दिवस इथं राहिलीस तर तुझी नि तिची गांठ पडेल–" ती

"तिच्याशीं लग्न करणार आहेस तूं ?"– ती.

"तसं अजून कांहीं ठरलं नाहीं –" तो.

"म्हणजे तुमचं सारं वरवरचं आहे तर ?–" ती.

"हो ! तस्संच.... निदान अजून तरी—!" तो.

"छान ! आम्ही खेडयांतील माणसं... आम्हांला कांहीं समजत नाहीं यांतलं ?"– ती.

तेवढयांत दादर स्टेशनवर गाडी थांबली. दोन तरुण मुली व चार तरुण मंडळींचा एक घोळका त्यांच्या डब्यांत शिरला. ती मंडळी समोरच्या भागांतील मोकळया जागेंत गेली.

ती मंडळी दिनेशच्या परिचयाची होती. त्यानें त्यांना पाहिले. पण ती आपल्याच नादांत आणि हास्य विनोदाच्या नादांत होती.

त्यांच्यापैकीं एक तरुणी नेमकी दिनेशच्या दृष्टीस पडेल अशा रीतीनें स्थानापन्न झाली होती आणि बाजूच्या तरुणाच्या हाताशी तिच्या हाताची हातमिळवणी चालू होती.

दिनेशकडे तिची एकदम नजर गेली व धांवतच दिनेश बसला होता तिथं आली.

"दिनेश— सॉरी अं –" वासंतीला त्याच्याजवळ पाहून थोडीशी खजील होऊन ती म्हणाली.

"ही माझी बाल मैत्रिण वासंती – आमच्या गांवचीच आहे. तिला घेऊन मी गोरेगांवला तिच्या मावशीकडे चाललो आहे–" त्यानें खुलासा केला.

"छान ! मी आज दादरला शालिनीचा नृत्याचा कार्यक्रम पहायला गेले होते. आणि आतां आम्ही जुहूला जेवण्याकरितां चाललों आहोंत. जसवंतरावांनीं ही पार्टी मुद्दाम ठरविली. मला शिष्यवृत्ति मिळाल्या-बद्दल–" तिनें माहिती पुरविली.

"मी तुमच्या घरीं गेलों होतों...... मला वाटलं होतं कीं तुमची गांठ पडेल आणि तुला शिष्यवृत्ती मिळाल्याचं पण मी वाचलं !" तो म्हणाला.

तेवढयांत जसवंतराव तिथें आला. "अरे दिनेश तूं कुठं निघालास? काय मजा आली होती डान्सला. अरे तुला मी फोन करायचा प्रयत्न केला. पण तो लागलाच नाहीं. चल येतोस कां जुहूला सन अँड स्टँड-मध्यें जेवणाचा बेत आहे. तुझ्या या मैत्रिणीला आज मोठी स्कॉलरशिप मिळाली आहे–" जसवंतराव त्याला म्हणाला.

"मी पुन्हां केव्हांतरी येईन. आज मला गोरेगांवला ह्या पाहुणीला पोंचविलं पाहिजे–" दिनेश म्हणाला.

जसवंतरावानें वासंतीकडे दृष्टिक्षेप टाकला. चुणचुणीत, गौरवर्णीय काळाभोर डोळयांची व लांबलचक केशभार असलेली ती कांहींशीं खेडवळ वळणाची तरुणी पाहत जसवंतराव थोडा चपापलाच होता.

"अरे या पाहुणीला देखील घेऊन चल नां–" त्यानें सहज आग्रह केला.

"आपण पुन्हां केव्हांतरी जाऊं या नां"–दिनेश तुटकपणानें बोलला.

तेवढ्यांत रिटानें आपली तीक्ष्ण नजर वासंतीवर रोखली होती व तोंडाऐवजी डोळ्यांच्या सहाय्यानें भक्षण करतां आलें असतें तर किती छान झालें असतें असें तिला झाले होते. आपल्याशीं गोड गोड बोलणारा आणि इकडे तिकडे हिंडविणारा दिनेश असा असेल असें तिला वाटले नाहीं. आपणावरोबर प्रेमाचे लपंडाव खेळत असतां गावांकडील ही मैत्रिण यानें आपणांपासून कुठं तरी दूर लपवून ठेवली होती व त्याला कसें मुद्देमालासकट आपण पकडले होते असा भाव तिच्या चेहऱ्यावर उमटला होता.

"ठीक आहे ! चल जसवंत आपण जाऊं या–" आपल्यापेक्षां कितीतरी वडील असणाऱ्या त्या जसवंतरावाचा हात धरून रिटा आपल्या पलिकडील कपार्टमध्यें गेली. जातां जातां तिनें एक तीक्ष्ण कटाक्ष वासंतीकडे फेकला.

आपल्यापासून शिष्यवृत्तीची गोष्ट रिटानें लपवून ठेवली आणि तिनें आपल्याला मुळी देखील विश्वासांत घेऊं नये या घटनेमुळें त्याला तीव्र दुःख झाले होते.

हा सारा प्रकार होईपर्यंत गाडी सांताक्रूझ स्टेशनपर्यंत पोचली. रिटा आणि जसवंतराव दिनेशकडे विल्कुल न पहातां खालीं उतरले. अगदीं दूर जाईपर्यंत त्यांचे ते हंसणें खिदळणें दिनेशला आणि वासंतीला ऐकूं येत होते.

गाडी सुरू झाली. दिनेश अगदी गप्प होता. त्याचे डोके सुन्न झाले होते. जसवंतरावाकडे त्या फाजील नजरेनें रिटाचे तें पहाणें, हंसणें, नाचणें नि मुरडणें त्याला बिलकुल आवडले नव्हते. त्यांतून त्याच्याशीं अगदीं स्वैरपणानें ताळतंत्र सोडून वागणें व त्याच्या हाताला हात लावून मुद्दाम मान हालवित जाणें म्हणजे त्याच्या सहनशक्तीचा अंतच होता.

"कारे... हीच ती सुहासिनी नां ? .......कां गेला नाहींस तिच्या बरोबर?..... मी गेले असते मावशीकडे एकटी. मी कांहीं तशी भित्री नाहीं–" वासंती त्याला म्हणाली.

"छे ग ! हें आपलं नेहमींचच आहे. मला चुकवून ही मंडळी चालली होती जुहूला. वरी सांपडली आयती. आतां मी आहे अन् ती–" तो कांहींसा क्रुद्ध होऊन म्हणाला.

"पण तूं तिच्याशीं लग्न करणार म्हणतोस नां ? मग चांगली थोबाडींत कां दिली नाहींस? चाहटळ मेली.... हें बघ दिनेश..... तूं जरा दुसरी वहिनी बघ. ही तुझ्या डोक्यावर मिरे वाटेल...तुझी चटणी करील—" वासंतीनें त्याला पोक्त सल्ला दिला.

"ती तशीं नाहीं गं... अगदीं भावडी नि भोळसर आहे–आणि शहरांत राहून जर आजकालच्या मुली मोकळेपणानं वागल्या म्हणून एकदम डोक्यांत राख घालून घ्यायची नसती. अगं अशा चांगल्या मुली हस्तगत करायच्या म्हणजे एक चुरस आहे चुरस. खेळ आहे तो ! त्या जसवंतरावानें आपल्या पोकळ डौलाचे जाळें तिच्याभोंवतीं गुंतले असले तरी तिच्या मागें उड्या मारताना त्याचा तो पोक्त जीव जेव्हां रडकुंडीला येईल त्यावेळीं बेट्याला समजेल की रिटा ही काय चीज आहे–" तो.

"छे ! छे ! हो भलताच खेळ दिसतोय ? यांत कसले प्रेम नि कसले जीवन..." ती.

"मी आतां माघार घेतली तर एका बुढ्यानें मला हरविले असा बभ्रा होईल.... रिटाला मी मोकळी सोडणार नाहीं–" तो.

"म्हणजे तिचं जर तुझ्यावर खरं प्रेम नसेल तर ती अशी वागली असती कां?... जरा चमत्कारिक वागणं दिसलं तिचं—" ती.

"अगं ह्यांत प्रेमाची भानगड नाहीं. जसवंतरावांना तिला इथं झुलत ठेवण्याचा बेत आहे–" तो.

"मग आतां तूं काय करणार ? तूं कशाला असल्या पोरीच्या मागें लागतोस ? कोल्हापूरला असतांना तूं किती साधा नि प्रेमळ होतास. आतां तूं या शहरी वातावरणानें अगदीं भारावलेला दिसतोस." ती.

"मग काय म्हणतेस तुझ्यासारखी एखादी बायको पाहून संसार करूं म्हणतेस ?–" तो.

तिच्यासारखे मला गातां येत नसेल–पण संसारी माणसाला नक्कीच सुखी करीन मी. त्या जसवंतरावाची रग जिरविण्याऐवजी तिचा नाद कां सोडत नाहींस... माफ कर..." ती.

"तिचा नाद सुटणं कठीण ! तिच्यावांचून मला कांहीं देखील सुचणार नाहीं. उलट तूं अशी अचानक आलीस हेंच बरं झालं. त्यामुळें त्या जसवंतरावाची देखील थोडी जिरली असणार–" तो.

"म्हणजे एका वेळीं मला देखील दोन दोन पोरी जमा करता येतात असंच तुला दाखवायचं नां. छान! हें बघ दिनेश ! मला, आंत एक बाहेर असें वागतां येत नाहीं. तुझ्या मनाची तयारी असेल तर मी तुझ्यावरोबर वाटेल त्या संकटांत उडी मारायला तयार आहे...... मला अगदी प्रांजळपणं वाटतं कीं तुझ्या या गोड जीवाचं वाटोळं होऊं नये–" ती.

"छे ! छे ! आतां गाडी पार पुढील रुळावर गेली आहे. तिनं आपलं ठरलेलं स्टेशन गाठलं पाहिजे. मला तुझी भावना समजूं शकते. पण याला फार उशीर झाला. तूं मला दोन वर्षांपूर्वीं नव्हे दोन महिन्याच्या पूर्वीं जर भेटली असतीस तर तर—" तो अडखळला आणि पुढे म्हणाला,

"तर तुला आज रात्रीं मी मामाच्या घरांतून असं दूर सोडायला निघालोंच नसतो–"

"चावट कुठला–" ती.

तेवढ्यांत गोरेगांव स्टेशन आलें. आतां बाहेर पाऊस खूप जोरांत पडत होता. दिनेशनें तिची कातडी बॅग आपल्या हातांत घेतली नि तिनें पिशवी हातांत घेतली. स्टेशनबाहेर टांगा मिळाला. दहा मिनिटाच्या अवधींत लीलाताईचें घर आलें. त्यावेळीं रात्रीचे ११॥ वाजले होते. आणखी अर्धा तासानें शेवटची गाडी होती.

"तुला मावशीच्या स्वाधीन करून मला ती शेवटची गाडी गांठली पहिजे—" तो.

"पण मावशीकडे रात्रभर राहयलास म्हणून काय झाले—" ती.

"कदाचित् परत जातांना ती भेटेल" तो म्हणाला.

"म्हणजें अजून तुला आशा वाटते तर —" ती.

( पान ५१ वर पहा )














अनुक्रमणिका




# :४: आज दिसणारा वैफल्यवाद दुखावलेल्या अहंकारांतून जन्मला आहे..................

# विष्णु वामन शिरवाडकर

"उद्यां सकाळीं दहा साडेदहाच्या सुमारास या." असं शिरवाडकर मला म्हणाले. पुढें मी कांहीं म्हणायच्या आंतच ते म्हणाले "सर्वसाधारणपणें दहा साडेदहाला मी उठतो. पण उद्यां नऊ वाजतां उठेन तुमच्यासाठी. "ठीक आहे" म्हणून मी निघालो. "नऊ वाजतां मी उठेन तुमच्यासाठीं" हे शब्द घोळवीतच मी घरीं परतलो. शिरवाडकरांचा हा खाक्या आतां सर्वपरिचित आहे. सर्वसामान्यपणें माणसें जेव्हां गाढ झोपेंत असतात त्यावेळीं शिरवाडकरांची प्रतिभा जागी होते. कार्यरत होते. आणि माणसें जागीं होतात. भूपाळी रंगते. पक्ष्यांची किलबिल घरांतून सुरू होते तेव्हां शिरवाडकरांचीं नेत्रदळें मिटतात. त्यांचे भाऊ मला म्हणाले कीं, त्याला आम्हीं कविता वा कांहीं लिहितांना कधीं पाहिलं नाहीं. तेव्हां मला प्रथम आश्चर्य वाटलें होते. पण ते पहाणारच कसे ? ते जेव्हां गाढ निद्रेंत असत तेव्हांच कविता लेखनाचा शिरवाडकरांचा कार्यक्रम सुरू होतो. शांत, संयत, प्रसन्न, हंसरे व्यक्तित्व शिरवाडकरांना लाभलें आहे. शिरवाडकरांनीं खूप पाहिलं, भोगलं आहे. पण तें सारं पचवूनही त्यांची जीवन श्रद्धा मलिन झाली नाहीं. हास्य ओसरलं नाहीं. चेहऱ्यावरची टवटवी सरली नाहीं. अनेक प्रयोग त्यांनीं केले. त्यांत त्यांना नेहमींच यश मिळालं असं नाहीं. पण त्याच्या कटुतेचे ओरखाडे त्यांनीं कधीं मनावर येऊं दिले नाहीं. मनाची ऋजुता, संकोची स्वभाव, प्रसिद्धि विन्मुखता हे त्यांचे खास विशेष ! घाई, गर्वी, गडबड ही त्यांच्या स्वभावांत नाहीं. धीरगंभीर वृत्ति त्यांना लाभली आहे. वाचनाचे, मननाचें, चिंतनाचे वेड भारी आहे. आपल्या जीवनांत त्यानीं कांहीं श्रद्धा जपल्या आहेत. कांहीं मोठें मोल देऊन जपल्या आहेत. 'सरकारी नोकरी करायची नाहीं' ही निष्ठा त्यांतलीच ! घरीं गेलांत तरं नेहमीं हंसून स्वागत होईल. गप्पांचा शौक शिरवाडकरांना भरपूर ! आपण त्यांचा बहुमोल वेळ घेतो ह्या संकोचानें संकोचूं वा अस्वस्थ होऊं, पण साहित्य, कला, नाटक ह्या विषयींच्या गप्पांत ते इतके रंगून जातात कीं, कामाचे भान उरत नाहीं. 'लोकहितवादी मंडळ' हें शिरवाडकरांच्या प्रयत्नांचें एक सुफल आहे. आज नाशिकच्या सार्वजनिक जीवनांत ते समरसून भाग घेतात. "ह्यानें तुमचा वेळ जात नाहीं काय ?" असें मी त्यांना विचारलें. "वेळ जातो पण तो वांया जात नाहीं. त्यांतूनही कांहींतरी मिळतें" असं ते म्हणाले. 'क्रियाशील साहित्यिक' असं त्यांचं वर्णन करतां येईल. मागें संयुक्त महाराष्ट्र आंदोलनाचे वेळींही त्यांनीं प्रत्यक्ष भाग घेऊन आपली ही वृत्ति सिद्ध केली होती. आपलाच एक कोष निर्माण करून त्यांतच आत्मसंतुष्टतेनें गुरफटून घेणें त्यांना पटत नाहीं. फिरण्याचें, आकाशाचें, चांदण्यांचें त्यांना आकर्षण आहे. गांवाबाहेर गोल्फ ग्राउंडवरील हिरवळीवर जाऊन आकाशाकडे पहात शांतपणें तारकादळाशीं गुजगोष्टी करणें हा त्यांचा छंद आहे. आपली माती न विसरलेला—पण आकाशाच्या भव्यतेंत—रमणीयतेंत रमणारा शिरवाडकर हा कवि मराठीचें एक लेणें आहे असें मला वाटतें. कै. रमाकांत वेलदे त्यांना त्यांच्या संथ बेफिकीरीमुळें 'बादशहा' म्हणत असत. स्वत:संबंधीं कमी बोलणारे गृहस्थ म्हणून ते प्रसिद्ध आहेत. त्यांना बोलकें करावें लागतें. मीही हा एक प्रयत्न करून पाहिला.

## मुलाखत —प्रभाकर अत्रे

**प्रश्न :**— तात्यासाहेब, आपली अगदीं पहिली वहिली कविता आज आठवते काय ?

**शिरवाडकर :**—आठवते, १९२४-२५ त शाळेमध्यें असतांना हस्तलिखित मासिक मी काढीत असे. त्यावेळीं हस्तलिखित मासिक हीं सारी स्वत:चीच एकटाकी हौस असे. उत्तेजन फारसें नसे. सारें कांहीं स्वत:च करायचे. अशी दोन तीन मासिकें मी काढल्याचें मला स्मरतें. त्यांत मी सर्व प्रकारचें लेखन केलें. त्यावेळीं नारायणरावच्या वधावर मी पहिली कविता केल्याचें आठवतें.

**प्रश्न :**— पण काव्याचे बाबतींत जाणीवपूर्वक प्रयत्न आपण केव्हां केलांत ?

**शिरवाडकर :**—कॉलेजांत गेल्यावर ! तसा आधुनिक काव्याचा संस्कार माझ्यावर शाळेंत ५ वींत असतांना दत्तोपंत पुरोहित म्हणून शिक्षक होते त्यांनीं केला. तांबे शिकविला. गडकरी, बालकवि ह्यांच्या कविताही माझ्यावर संस्कार करून गेल्या. काव्य व नाटक ह्या दोन वाङ्मय प्रकारांचें मला









अनुक्रमणिका

प्रथमपासून आकर्षण वाटत आले आहे. पण प्रत्यक्ष त्या वाङमय प्रकारांचा जाणीवपूर्वक अभ्यास मॅट्रिकमध्यें असतांना व पुढें कॉलेजांत गेल्यावरच झाला असें म्हणतां येईल.

**प्रश्न :–** आपल्या ह्या वाङमयीन कर्तृत्वांत वडिलार्जित व आजोळकडून मिळालेल्या संस्कारांचा वारसा कितपत आहे !

**शिरवाडकर :–** म्हटले तर बराच आहे. तसे आमच्या घरांत लेखन करणारे कोणी नव्हते. मीच पहिला असेन. पण लेखनाला पोषक असे वातावरण मात्र होते. आमचे घर खेड्यांत होतें. आणि वडील वकील होते. ते उत्तम वाचक आणि रसिक होते. माझ्या लहानपणी घरात, बाहेर, दराऱ्याचे आणि शिस्तीचे प्राबल्य होते. सध्याच्या 'बालोद्यान' पद्धती अस्तित्वात नव्हत्या. त्यामुळें प्रत्यक्ष मार्गदर्शन वा प्रोत्साहन कोठेच मिळणें शक्य नव्हतं. (आणि त्याची फारशी आवश्यकता असते असेंहि मला वाटत नाही) परंतु आमच्या घरांत अनेक वृत्तपत्रें, मासिकें आणि अधुनमधून पुस्तकेंहि असत. टिळक, गांधी, गडकरी, खाडिलकर, नायडू इ. सुसंस्कृत जगांतील नांवे कानावर यावयाची. त्यांच्या कर्तृत्वाच्या कथा कानावर यावयाच्या. इतिहासासंबंधीचे प्रेम आणि इंग्रजाबद्दलचा द्वेष या गोष्टीहि हवेत होत्या. या गोष्टींचा परिणाम झाला असावा. आमचे एक मामा तर कादंबरीकारच होते. राजाराम वामन जानोरकर. पण पुस्तकांच्या दुनियेत मी अधिक गुरफटलो तो सप्तशृंग वणी या गांवीं. तेथे आत्म्याचे घर होते. सप्तशृंगाच्या भव्य डोंगराच्या पायाशी हें गांव वसलेले आहे. इनामदाराचा मोठा थोरला वाडा अनेक कथा दंतकथांनी भरलेला. देवीचा पर्वत तर घरात येऊन पाटावर बसल्यासारखा वाटायचा. भितीवर तलवारी होत्या. तबेल्यांत घोडे होते. आणि मुख्य म्हणजे दिवाणखान्यांतील एका कपाटांत दोनतीनशें निवडक मराठी पुस्तकें कैद करून ठेवलेली होती. आम्ही गेल्यावर हे कुलूप उघडले जाई. गडकरी, खाडिलकर, चिपळूणकर, गो. गो. दातार, इत्यादींचा पहिला मनसोक्त परिचय तेथेच झाला. ही लेखनाची पूर्वतयारी होती असें म्हणायला हरकत नाहीं.

**प्रश्न :–** आणखी कांहीं लहानपणचे संस्कार आठवतात काय ?

**शिरवाडकर :–** वणीच्या परिसराइतकाच संस्कार नासिक व नासिकच्या नांवाशीं निगडित असलेल्या क्रांतिकारकांच्या कथांनीं, कृत्यांनीं माझ्या मनावर केला आहे. इतिहासाच्या वाचनाचा मला लहानपणापासून छंद आहे. त्या घटनांत मग्न होऊन जाण्याची, त्यांतल्या घटनांचे धागेदोरे कल्पनेनें जुळवीत बसण्याची, त्यांत स्वतःला गुरफटून घेण्याची वृत्ति त्यांतूनच आली. आणि अशा प्रवृत्तीला

श्री. वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज)

काव्याच्या माध्यमांतून स्वतःला अभिव्यक्त करणं मग अपरिहार्य होतं असं मला वाटतं. माझं प्रथमचं बहुतेक सर्व लेखन हें काव्यच होतं. **"नवामनु"** नांवाचं साप्ताहिक इथे तुमचे वडीलच काढीत असत. त्यांत माझ्या कांहीं प्रारंभीच्या कविता प्रसिद्ध झाल्या. **बालबोध मेवा** तुतारी वगैरेंत कांहीं कविता प्रसिद्ध झाल्या.

**प्रश्न :–** त्या कविता कोठल्या पुस्तकांत आहेत का ?

**शिरवाडकर :–** नाहीं. त्या हरवल्या आणि हरवाव्यात अशाच होत्या त्या !

**प्रश्न :–** पण तेव्हां असं वाटत नसेल ?

**शिरवाडकर :–** नव्हतं वाटत. जगांतल्या साऱ्या महाकवींना आपण मागे टाकीत आहोत असं वाटायचं. पण या काळांत काव्य लेखनाची, कविवृत्तीची धुंदी विलक्षण असते. त्यामुळें लेखनहि झपाट्याने व्हायचे. तितक्याच झपाट्याने ते प्रकाशित व्हावे असेंहि वाटायचे.

**प्रश्न :–** होत असे का ? नव्या लेखकाला प्रकाशन मिळणें फार कठिण असते असे म्हटले जाते. सर्वत्र, 'गटबाजी',

'झब्बूशाही' इत्यादि प्रकार असल्यानें नव्या लेखकाला पुढें यायला वाव मिळत नाहीं, अशी अनेकांची तक्रार असते. तुमचा अनुभव काय होता ?

**शिरवाडकर** :—स्थानिक मासिकापासून मला लौकर प्रकाशन मिळाले. पण चांगल्या प्रतिष्ठित मासिकांकडे प्रयत्न करताच 'साभार परतचे' प्रकरण सुरू झाले ! ते बरेच दिवस चालले होते. पुढे 'रत्नाकरा'त दोन कविता छापून आल्या आणि आभाळाला हात लागले. पण याहि कविता मी संग्रहात घातल्या नाहीत. प्रारंभीचे पुष्कळसे लेखन अनुकरणात्मक, अर्धेकच्चे असते. त्याबाबत Judgement यायला काही काळ जावा लागतो. पण लिहीत राहिल्यावर ते येतेहि. गटबाजी, झब्बूशाही इत्यादि प्रकरणे कपोल-कल्पित आहेत. जो संपादक अथवा प्रकाशक मासिक पुस्तके काढतो त्याला स्वतःची काही दृष्टि असते. मते असतात. त्या मतानुसार तो संपादन करणार हे उघडच आहे. संपादकांसंबंधीं नेहमी प्रचारांत असलेला समज किती खोटा असतो, हे त्या व्यवसायात गेल्यावर माझ्या ध्यानांत आले. बहुतेक संपादकाला खरोखर नवीन लेखक हवे असतात. त्यांचा ते सतत शोध घेत असतात. पण टेबलावर येऊन पडणाऱ्या भाऱ्यांतील पांच टक्के मजकूरदेखील वाचण्यासारखाहि नसतो, छापणे दूरच. त्यामुळें त्याला वारंवार जुन्याकडे वळावे लागते. 'साभार परत'चे अपरिहार्य पर्व संपल्यावर प्रतिभा, प्रगति, संजीवनी, विहंगम, ज्योत्स्ना इत्यादि नियतकालिकांनीं माझ्या कवितेचे बरेच कौतुक केले.

**प्रश्न** :— लहानपणापासून केवळ काव्य नाटकाचाच छंद आपल्याला होता काय ?

**शिरवाडकर**:—क्रिकेट, नाटक आणि वाचन हे माझे तीन छंद होते. क्रिकेट मी ज्युनियर शील्ड मॅचेसमध्यें खेळलो. तो खेळ मला आवडतो. पण त्यांत खास प्रगति झाली नाहीं म्हणून मी तो छंद सोडून दिला. नाटक व वाचन हे दोन मात्र टिकून राहिले. नाटकांचे वाचन जमेल तसें चालू होतेच. गडकऱ्यांच्या नाटकांतले उतारे पाठ असत. त्याचा संस्कार गद्यावर झाला असावा. बालकवि, गडकरी, माधव ज्युलियन, तांबे व केशवसुत ह्यांची कविताही निष्ठेनें वाचली. ह्या सर्वांनीं मला खूप दिलें आहे.

**प्रश्न** :— शिक्षण पूर्ण झाल्यावर आपण चित्रपट व्यवसायाकडे कसे वळलांत ?

**शिरवाडकर**–सिनेमाचें आकर्षण हा नाटकाच्या प्रेमाचाच एक भाग असावा. शाळा कॉलेजांत असतां देशीपरदेशी चित्रपट पाहण्याचा माझा उद्योग जोरांत चालू होता. चार्ली चॅप्लीन, ओमिल जेनिंग्ज, ग्रीटा गार्बो, चार्लस बॉयर या कलावंतांच्या चित्रपटांतून त्या कलेचे आणि अभिनयाचे अपार सामर्थ्य माझ्या प्रत्ययाला आले होते. शिवाय सरकारी नोकरी करायची नाहीं हा पहिल्यापासून मनाचा निर्धार होता. साहित्याशीं संबंधित अशा उद्योगाची ओढ होती. आपल्या स्वच्छंदीपणावर फारशी बंधनें येऊं नयेत असेंहि वाटायचे. त्यामुळें स्वातंत्र्य अधिक आणि अस्थिरताहि अधिक असे धंदे शोधण्याकडे प्रवृत्ती झाली असावी. अशा अस्थिर पण आकर्षक धंद्याचा बादशहा म्हणजे सिनेमा. (वृत्तपत्रव्यवसाय हा त्याचा वजीर !) घरांतली सुबत्ता त्यावेळीं पार ढांसळली होती. मी घर सोडून मुंबईला गेलो. नोकरी मिळविण्याचें तंत्र अजिबात अवगत नव्हते. कोठलीहि चिट्ठीचपाटी जवळ न ठेवतां, मळके आणि अशिष्ट कपडे घालून मी फाटका फाटकातून संचार करी आणि लालाजीनें आंत सोडले तर आपण पदवी मिळविण्याइतके सुशिक्षित आहोत ही रोमहर्षक वार्ता सांगून मालकाला चकित करी. इतके शिक्षण या धंद्याला परवडत नाहीं असे सांगून मालकहि मला चकित करीत. स्टुडियोनंतर कांहीं शाळाहि नाइलाजानें तपासल्या. तेथेंहि–सुदैवानें–जमले नाहीं. मुंबईतील भयानक बेकारीचा अनुभव घेऊन पुन्हां नाशिकला आलो. बंद पडलेल्या हिंदुस्तान सिनेमा कंपनीत पुन्हां कांहीं हालचाल होत आहे असे ऐकले आणि तिकडे गेलो. तेथे मामा शिंदे–फाळक्यांचे शिष्य भेटले. ते कंपनी काढायच्या तयारींत होते आणि आपल्या कल्पनेप्रमाणें स्टोरी लिहून देणारा लेखक त्यांना हवा होता. मामांची माझी चांगलीच दोस्ती जमली. गोदावरी सिनेटोन ही कंपनी स्थापन झाली आणि हजारो भानगडीं-नंतर 'सति सुलोचना' हा बोलपट बाहेर पडला. आणि पडलाहि ! या चित्राचे लेखन मी केले होतें आणि त्यांत एक भूमिकाहि केली. हा आमच्या चित्रपट व्यवसायाचा प्रारंभ.

**प्रश्न** :— आणि शेवट ?

**शिरवाडकर** :—शेवटहि लौवकरच झाला. पण मुंबईत. 'गोदावरी' आटोपल्यावर मी पुन्हा मुंबईला गेलो. मामाहि आले. नवी कंपनी काढायचे मनसुबे सुरू झाले. दोघांचेहि खिसे रिकामे. एका बाजूला लाखाच्या गोष्टी तर दुसऱ्या बाजूला एकादशा सुरू झाल्या. कोठून थोडेफार पैसे आले अथवा आणले तर ते एजंटाच्या बॅगेंत जायचे. दहावीस रुपये काढण्यासाठीं एजंट जी फसवणूक वा बनवाबनवी करीत ती केवळ अमर्याद. पुढे मालक होण्याचा नाद सोडला आणि एका गुजराथ्याच्या कंपनींत अ. डायरेक्टर म्हणून नोकरीला राहिलो. तेथे नुसतीच नोकरी होती. पगार नव्हता. एक दिवस वैतागलो आणि पहाटे दीड दोन वाजता स्टुडियोतून, कोणाला न विचारता बाहेर पडलो.







अनुक्रमणिका

द्रव्याचा संपूर्ण अभाव असल्यानें दादरपासून गिरगावां-तील माधवाश्रमापर्यंत पायी चालत आलो. अविस्मरणीय प्रवास होता तो. लाक्षणिक अर्थानें नसेल पण प्रत्यक्षार्थानें मुंबईचा फूटपाथ माझ्याइतका कोणत्याहि लेखकानें पाहिला अथवा अनुभवला नसेल ! नंतर सिनेमाला निरोपाचा नमस्कार केला आणि तितक्याच अस्थिर, आकर्षक पण दरिद्री (ही पंचवीस वर्षांपूर्वीची गोष्ट आहे) अशा दुसऱ्या व्यवसायांत शिरलो. वृत्तपत्राच्या.

**प्रश्न :–** कोणत्या पत्रांत प्रथम नोकरी केलीत ?

**शिरवाडकर :–** परुळेकरांच्या 'प्रभा' या साप्ताहिकांत. 'प्रभा'मध्यें वृत्त-पत्रीय व्यवसायाचें शिक्षण मला चांगलें मिळालें, पण पगाराची ओढाताण असल्यानें तीहि नोकरी सोडावी लागली. नंतर मी पुण्याला गेलो. कोठारींच्या दैनिक 'प्रभात'-मध्यें. त्यानंतरच्या काळांत सारथी, धनुर्धारी, नवयुग, स्वदेश ही पत्रें झालीं. सुमारें १५ वर्षें या व्यवसायांत काढलीं.

**प्रश्न :–** 'जीवनलहरी' तील कविप्रवृत्ति बरीच हळवी, आत्ममग्न, निराश आणि कांहींशी उमरखय्यामीहि दिसते. नंतरच्या 'विशाखा' संग्रहांत हें चित्र खूपच बदललेलें दिसलें. 'अग्निसंप्रदाय' विशाखेंतच अवतरला. हा बदल या मधल्या काळांतील अनुभवांमुळें घडून आला असावा, नाहीं का ?

**शिरवाडकर :–** नक्कीच ! जे मला जाणवलें ते मी लिहिलें. या जाणिवा मला पुस्तकांत अथवा पुढाऱ्यांच्या व्याख्यानांत सांपडल्या नाहींत, तर प्रत्यक्षांत. पुस्तकांमुळें अथवा भोंवतालच्या वैचारिक वातावरणामुळें त्यांच्यावर कांहीं संस्कार झाले असतील हे मात्र खरें.

**प्रश्न :–** विशाखेंतील पुष्कळशा कवितांवर कम्युनिस्ट मताची दाट छाया पडलेली आहे असा एका टीकाकारानें तुमच्या-वर आरोप केला होता. तो कितपत खरा आहे ?

**शिरवाडकर :–** कम्युनिस्ट असण्यांत कांहीं नैतिक गुन्हेगारी नाहीं म्हणून त्यांत आरोप करण्याचा किंवा आरोपमुक्त होण्याचा प्रश्न नाहीं. धर्म अनेक असले तरी त्यांच्या मुळाशी कांहीं समान प्रेरणा असतात. त्यावर कोणाचीहि खास मालकी असत नाहीं. माझें काव्य कोठल्याहि विशिष्ट मतप्रणालीशी बांधलेलें आहे असें वाटत नाहीं. मूळ दृष्टिकोनाचा गाभा एक असला तरी विविध संस्कार त्यांतून व्यक्त झाले आहेत.

**प्रश्न :–** पण मडगांवच्या भाषणांत तुम्ही म्हणालांत कीं, साहित्यानें राजकारणाची जाणीव ठेवायला हवी. संयुक्त महा-राष्ट्राच्या चळवळींत तुम्ही बराच भागहि घेतला होता !

**शिरवाडकर :–** हो, राजकारणाचा रस्ता रामेश्वरला आणि साहित्याचा काश्मीरला जातो असें मानणें चूक आहे. एकूण जीवनाची अशी कप्पेबार विभागणी होऊं शकत नाहीं. लेखकाची जीवनविषयक जाणीव जेवढी व्यापक, सर्व-स्पर्शी आणि मूलगामी असेल तेवढें त्याचें लेखन अधिक समृद्ध होईल. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ तर केवळ राजकीयहि नव्हती, भाषिक आणि सांस्कृतिकहि होती.

**प्रश्न :–** ठीक आहे. एक जरा बाजूचा प्रश्न विचारतो. वृत्तपत्र व्यवसाय सोडल्यावर तुम्ही लेखनाशिवाय दुसरा कोणता व्यवसाय केला नाहीं. पण लेखन हा व्यवसाय होऊं शकतो का ? म्हणजे त्यांतून–

**शिरवाडकर :–** लक्षांत आलें ! लेखनाचा व्यवसाय होऊं शकत नाहीं असें म्हणण्याची एक पद्धत आहे. पण सध्यां तरी तें चूक आहे. अलीकडे शालेय प्रकाशनांनीं मला हात दिला हे खरें आहे. पण कित्येक वर्षें मी लेखनावरतीच अवलंबून होतो. आणि शालेय प्रकाशन, नाट्यप्रयोग, सिनेमा, रेडियो इत्यादि गोष्टीहि लेखकाशीं संबंधित त्याच्या आनु-षंगिक अशा आहेत. हा व्यवसाय फार चांगल्या प्रकारें करणारे, माझ्यापेक्षां अधिक पटीनें अनेक लेखक मला माहीत आहेत. चांगलें आणि भरपूर लिहिणाऱ्या लेखकाला सध्यां या व्यवसायांत कांहीं अडचण आहे असें दिसत नाहीं. अर्थात् यांतील कमीजास्त त्याच्या यशावर



अनुक्रमणिका

आणि लेखनाच्या स्वरूपावर अवलंबून राहील. पण ही परिस्थिति सर्वत्रच असते.

**प्रश्न :–** वृत्तपत्रीय कारकीर्दीचा तुमच्या Creative writing वर कांहीं परिणाम झाला काय ?

**शिरवाडकर:**—नाहीं. दैनिकांत आणि साप्ताहिकांत काम करीत असतांना माझें लेखन अव्याहत चालू होतें. "गर्जा जयजयकार" ही कविता तर दैनिकाच्या कचेरींतच सुचली. पत्रव्यवसाया-मुळें गद्य लेखनाला चांगला वाव मिळाला.

**प्रश्न :–** तुमच्या कविता त्या काळांत प्रसिद्ध होत होत्या. त्यांच्या प्रतिक्रियांची पहिली जाणीव कधीं झाली ?

**शिरवाडकर:**—'जीवनलहरी' बी. ए. ला असता प्रकाशित केले. छोटे पुस्तक. पण एकूण अभिप्राय फार प्रोत्साहक आले होते. 'विशाखा' पुढें दहा वर्षांनीं प्रकाशित झाले. त्या वेळीं बहुतेक कविता 'ज्योत्स्ने'तून मी प्रसिद्ध करीत होतो. खांडेकरांना त्या आवडल्या. त्यांनींच आपण होऊन संग्रह काढायचे ठरविले. पहिल्या आवृत्तीवर प्रकाशक म्हणून त्यांनीं स्वतःचे नांव घातले. खांडेकरांचें दुर्मिळ मोठेपण असे की त्यांनी त्या काळांत मला पाहिलेहि नव्हते. प्रेस कॉपी द्यायला मी वर्षदीडवर्ष घेतले. ही दिरंगाईहि त्यांनी सहन केली. इतके निःस्वार्थी आणि मोठे मन फार क्वचित आढळते.

**प्रश्न :–** स्वतःचें काव्य आपण कधीं कुणाला प्रकाशना आधी वाचून दाखवीत नाहीं ?


काय लोक असतात पहा ! आपण ऑफीसला चाललोय् पण यांना आम्हीं पोहायला जातोय् अस कां वाटत कुणास ठाऊक?

**शिरवाडकर:**–नाहीं. आधीं जसें मी वाचून दाखवित नाहीं, तसे नंतरहि मी सहसा वाचून दाखवित नाही. काव्य वा अन्य लेखना-विषयक प्रतिक्रिया जाणून घेण्याची उत्सुकता मला फारशी वाटली नाहीं. वाटत नाहीं.

**प्रश्न :–** मग स्वतःच्या काव्यासंबंधीं कधीं चर्चा, चिकित्सा ?

**शिरवाडकर**—स्वतःच्या काव्यासंबंधीं बोलणें मला नेहमींच अवघड वाटत आलें आहे. व आपण जें बोलू तें खरें असेलच याविषयीं मला नेहमीं शंका वाटत आली आहे.

**प्रश्न :–** एखादा अनुभव जेव्हां काव्य, नाटक वा कथेचे माध्यमांतून अभिव्यक्त होतो, तेव्हां तो तें माध्यम स्वताःच घेऊन अभिव्यक्त होतो असें आपणांस वाटतें काय ?

**शिरवाडकर:**—आपापलें माध्यम घेऊनच तो तो अनुभव येतो असें मला वाटतें. जाणीवपूर्वक हें घडत असेल असें मला वाटत नाहीं. फारतर नाटक, कथा, कादंबरीबाबत हें घडत असेल. काव्याबाबत असें घडणें शक्य नाहीं कथा ठरवून कविता झाली वा काव्य ठरवून कथा झाली असें होत नाहीं.

**प्रश्न :–** अनुभव अभिव्यक्त होत असतांना त्याचें संपूर्ण Structure डोळ्यांपुढें उभें राहते आणि मग लेखनाला प्रारंभ होतो असें आपल्या बाबतींत घडतें काय ?

**शिरवाडकर:**—संपूर्ण तपशीलवार चित्र उभें रहात नाहीं. अंधुक रूप समोर असते. लिहिण्याच्या क्रियेमध्ये आकार येत जातो त्या अनुभवांना ! 'जान्हवी' लिहितांना त्यांतल्या चित्र-काराची व्यक्तिरेखा ही नंतर आली. नंतर सुचली. लेखनाची एकूण प्रक्रिया हीच मुळांत सजीव असल्याने तींत ही Growth अपरिहार्य आहे असें मला वाटतें. ही स्वतःच्या नियमांनी होत असते.

**प्रश्न :–** लिहितांना मग तपशील ठरलेला नसतो ?

**शिरवाडकर:**—तपशील स्थूल रूपानेंच ठरलेला असतो. स्थूल रूप असते तें सूक्ष्म होत जाते. त्यांत कांहीं नवीन, आवश्यक व अपरिहार्य अशी भर पडत जाते. बाजीराव मस्तानीच्या विषयावर नाटक लिहितांना त्यांच्या प्रेमाच्या परिणतीची आणि भोंवतालच्या विरोधी वातावरणाची स्थूल रूपरेषा समोर होती. लिहितांना नंतर तपशील भरला गेला. जो हा तपशील भरला जातो तो पूरक म्हणूनच येतो असें मला वाटते. त्यानें त्या चित्राला पूर्णता येते.

**प्रश्न :–** आपण कथा, लघुनिबंध, काव्य, नाटक, टीकात्मक अशा विविध माध्यमांतून लेखन केले आहे. परंतु त्यांतल्या त्यांत आवडतें माध्यम म्हणून आपण कोणतें मानतां ?

**शिरवाडकर:**– काव्य आणि नाटक हा ह्या दोन माध्यमांबाबत मला त्यांतल्या त्यांत जिव्हाळा जास्त वाटतो. त्यांतही काव्य



अनुक्रमणिका

लेखनाचें माध्यम मी अधिक जवळचें व जिव्हाळ्याचें मानतो.

**प्रश्न :–** साहित्यांत आत्मचरित्राचा भाग येतो असें आपण मानतां काय ? आपला अनुभव काय ?

**शिरवाडकर:–** 'आत्मचरित्र' हा शब्द मोठा फसवा आहे. मला असें वाटते कीं, काव्यांत वा साहित्यांत अनुभव असतात. स्वतःचे, दुसऱ्याचे पण स्वतः पचविलेले, त्या त्या पातळी-वर जाऊन घेतलेले अनुभव असतात. ह्या अनुभवविषयक सिद्धांतात सारें वाङमय वसतें असें मला वाटतें. तिथें "मेघदूत"ही वसते आणि नवकविताही वगळली जात नाहीं. मेघदूतांत कैलास दर्शनाचे जें वर्णन आहे त्यांत कवीला शंकराचें राशीभूत झालेलें हास्य दिसतें. हा त्याचा एक खास अनुभव आहे. ते अनुभव कधीं वैचारिक असतील तर कधीं भावनात्मक असतील.

**प्रश्न :–** आपल्या काव्य-नाटकाच्या अभ्यासांतून एक जाणवतें तें असें कीं, आपल्याला ट्रॅजेडीज्‌चें आकर्षण फार वाटतें. हें कितपत खरें आहे ? असल्यास त्याची कांहीं मीमांसा करतां येईल काय ?

**शिरवाडकर:–** ट्रॅजेडीचें मला आकर्षण आहे ही गोष्ट खरी आहे. ट्रॅजेडीच नकाशा नेहमींच अधिक मोठा, भव्य असतो. ती जीवनाच्या तळाशीं जायचा प्रयत्न करते. माणसाच्या भल्याबुऱ्या सामर्थ्याचा कस ट्रॅजिक सिच्युएशन्समध्यें जितका लागतो तितका अन्यत्र लागत नाहीं. कर्णाचेंच उदाहरण आपण घेऊं या. कर्ण हा वैयक्तिक नातीं मानणारा मनुष्य होता. त्यांतून त्याची सारीं सुख दुःखें उत्पन्न झालीं. ऐन युद्धाच्या वेळीं त्याच्यापुढें फार मोठा संघर्ष उत्पन्न झाला. पांडव हे आपले भाऊ आहेत हें त्याला कळलें. दुर्योधनाला त्यानें सतत मित्र मानलेला होता. भाऊ आणि मित्र असा एक फार मोठा आणि फार विचित्र असा संघर्ष त्याच्यापुढें उभा राहिला. दासीपुत्र, सूतपूत्र—म्हणून त्याला सतत मानसिक यातना सहन कराव्या लागल्या. ज्या स्त्रीमुळें हें सारें घडलें त्या स्त्रीबद्दलचा आत्यंतिक तिरस्कार त्याच्या शब्दांतून व्यक्त होतो. जें मातृत्व मुलाचें संरक्षण करूं शकत नाहीं तें निंद्य आहे असें तो म्हणतो. ऐनवेळीं त्याला शस्त्रविद्येचें विस्मरण होतें. तें पूर्वीच्या कांहीं शापांमुळें असें आपण वाचतो. परंतु Rationalistic picture उभें केलें तर असें दिसतें कीं, कुंती भेटून गेल्यानंतरच्या त्याच्या मनांत जो संघर्ष उत्पन्न झाला आहे. आपण भावांविरुद्ध उभे आहोंत ही जी एक फार दारुण अशी मानसिक अवस्था त्यांच्या वांटयाला आली आहे. त्यांतून त्याला ते विस्मरण होतें. आत्मसमर्पणावांचून ह्या द्वंद्वांतून बाहेर पडण्याचा दुसरा मार्ग नाहीं असें त्याला वाटते व त्याप्रमाणें तो करतो.

काव्याच्या बाबतींत मात्र जी व्यक्त झाली आहे ती निराशा! वैयक्तिक अनुभवांतून ती येते. Tragedies च्या आकर्षणाचें कारण वेगळें आहे आणि काव्यांत व्यक्त होणाऱ्या निराशेचीं कारणें वेगळीं आहेत. ह्या दोन्ही गोष्टी भिन्न आहेत.



अनुक्रमणिका

**प्रश्न :–** वूडहाऊससारखा विनोदी लेखक आपला अत्यंत आवडता असून आपल्या लेखनांत एकूण विनोदी लेखनापेक्षां गंभीर, चिंतनात्मक असाच भाग जास्त दिसतो हें कसें ?

**शिरवाडकर :–** वुडहाऊस, चार्ली चॅप्लीन हे माझे अतिशय आवडते लेखक, नट आहेत हें खरें ! आजही मला ते आवडतात. परंतु एकूण विनोद हा माझ्या प्रकृतीशीं मिळता जुळता नाहीं हेंच खरें असावें. जें कांहीं मी विनोदी लिहिलें आहे तेंही अनुकरणात्मक आहे असें मला वाटतें.

**प्रश्न –** आपलें काव्य हे आपल्या नाटकांना मारक ठरलें आहे असें कांहीं टीकाकारांचे मत आहे. आपल्याला त्यावद्दल काय वाटतें ?

**शिरवाडकर :–** काव्य हें खरें म्हणजे कोणत्याच वाङमय प्रकाराला मारक आहे वा होतें असें वाटत नाहीं. Poetic approach ला साहित्य निर्मितींत महत्व आहे. कुठल्याहि मोठ्या कलाकृतीच्या मुळाशीं तो असतो – असावाही लागतो. शेक्सपियर, कालिदासासारख्या मोठ्या कलाकारांतहि तो होता. मूलतः सर्व मोठ्या कलाकृतींतून तो approach आहे. सर्व लेखक काहीं प्रमाणांत कवि असतात. ह्यावावतींत फार तर असें म्हणतां येईल कीं प्रमाण चुकलें, balance विघडला तर हानी होऊं शकते. पण काव्य हें तत्त्वतः नाटकाला मारक ठरतें असें मात्र मला मुळींच वाटत नाहीं.

**प्रश्न :–** आपण विविध प्रकारचीं माध्यमें वापरलीं आहेत. कधीं ह्या माध्यमामावावत संघर्ष उत्पन्न होतो कां हो ?

**शिरवाडकर :–** तसा माध्यमाच्या वावतींत संघर्ष येत नाहीं. कारण प्रत्येक अनुभव आपापलें माध्यम घेऊनच येतो असे मला वाटतें. काव्याचा अनुभव वेगळा, नाटकाचा वेगळा, कादंबरीचा वेगळा असा असूं शकतो.

**प्रश्न :–** विशाखेंतील ईश्वरविषयक कवितांतून नास्तिकता व्यक्त होते असें वाटतें. नंतरच्या कवितेंत अधिक अंतर्मुखता आढळते. कांहीं स्पष्टीकरण ?

**शिरवाडकर :–** नास्तिकता हा सुद्धां ईश्वर संबंधीच्या ओढीचाच एक अपरिहार्य भाग आहे. अस्तित्वाचा शोध घेतांना तें जाणवत नाहीं. पटत नाहीं म्हणूनच माणसें नास्तिकतेंत गुरफटून जातात. ईश्वरविषयक शोधांतल्या ह्या अपरिहार्य अवस्था आहेत, असें मला वाटतें. काव्यांत त्या त्या काळांतलें कांहीं Moods व्यक्त झाले आहेत असें मला वाटते. त्यात वैचारिकतेचा वा तर्काचा भाग नाहीं. चिंतनांतून वा परिस्थितींतून येणारी ती एक भावस्थिति असते. एक गोष्ट मात्र खरी कीं, मला ह्या विषयाचें प्रथमपासून बरेंच आकर्षण आहे.

**प्रश्न :–** आपलें साहित्य हेतुप्रधान असूनही प्रचारकी वाटत नाहीं. कलेची आपली बैठक सुटत नाहीं. हें कसें काय साधलें ?

**शिरवाडकर :–** प्रचार हा बहुधा दुसऱ्या कोणाचे अनुभव वा भावना व्यक्त करणारा असतो. जेव्हा स्वतःच्या निष्ठा नसून माणसे लिहितात तेव्हां त्याला हिणकस स्वरुप येते. चांगले प्रचारी लेखनहि असते. पण तेथे लेखकाची भूमिकाच वेगळी असते. कलाकृति निर्माण करण्याची नव्हे तर तार्किक विचार तार्किक पद्धतीनें सांगण्याची. पण एकंदर हे प्रकरण फार भानगडीचे आहे. प्रचार कोठे आहे आणि कोठे नाही हे सांगणे फार कठीण आहे. Anti-ideology is also ideology हे आर्थर मिलरचे म्हणणे फार खरे आहे. जे लिहावेसे वाटेल ते लिहावे, कोठल्या पंथात ते पडते याची तपासणी करण्याच्या फंदांत पडूं नये या धोरणानें मी लिहीत आलो.

**प्रश्न :–** साहित्यांत डोकावणाऱ्या वैफल्यावद्दल आपण अलिकडे फार तीव्रतेनें बोलतां. आपल्याला नेमकें काय म्हणावयाचें आहे ?

**शिरवाडकर :–** 'वैफल्यवाद' हे एक भ्रामक आणि जीवनाला विरोधी, विसंगत असें प्रकरण आहे. व्यक्तिगत निराशा मी समजूं शकतो. ती काव्यात, साहित्यात प्रगट होणे अपरिहार्य आहे. पण एकूण जीवनासंबंधीचा सार्वत्रिक दृष्टिकोन म्हणून वैफल्याचें कौतुक करणे, ते साहित्याच्या सच्चेपणाचे आणि मोठेपणाचे एक हमखास लक्षण आहे असे मानणे बरोबर नाहीं. जुन्या मायावादाचा हा एक नवा अवतार आहे. पुरोगामी प्रतिगामी हे शब्द सध्यां अनेकांना आवडत नाहीत. पण जे प्रतिगामीच आहे त्याचे वर्णन वेगळ्या शब्दाने करता येणार नाही. समाजाचे जुने बांधकाम सध्या कोलमडत आहे. नवीन आकार घेत आहे. याच परिवर्तनाला कांहीं अपरिहार्य दिशा आहे. ही अपरिहार्यता ज्यांना सहन होत नाही त्यांच्या दुखावलेल्या अहंकारांत या वैफल्याचा जन्म झाला आहे. तो फार थोड्या लोकांचा आहे – सर्वांचा नव्हे.

**प्रश्न :–** तात्यासाहेब, आतां तुम्हीं कसें लिहितां, तुमची पद्धत काय वगैरे संबंधी कांहीं कुतुहलाचे प्रश्न विचारतो. आपण लिहितां त्यापूर्वी एखादा अनुभव मिळाला कीं कांहीं टिपणें, नोंदी ठेवतां ?

**शिरवाडकर :–** टिपणें करतो. कथा–नाटकांची करतो. ४–६ ओळींत मी मूळ कल्पना लिहून ठेवतो. नाटकाची कल्पना मात्र तपशीलवार लिहितो.

**प्रश्न :–** आणि काव्याबद्दल ? गुणगुणत कविता जन्म पावते काय ?

**शिरवाडकर :–** काव्य मात्र मी एकदमच लिहून टाकतो. गुणगुणत वगैरे कांहीं नाहीं. अर्धवट राहिलेल्या कविता नंतर पूर्ण करतो. पण काव्यविषयक Notes वगैरे कांहीं ठेवीत नाहीं.

**प्रश्न :–** कांहीं खास वातावरणाचा आग्रह ?

**शिरवाडकर :–** मी एकटा असल्याशिवाय कधीं लिहीत नाहीं.

**प्रश्न :–** लिहितां केव्हां तुम्हीं ?

**शिरवाडकर :–** दुपारीं वा रात्रीं लिहितो.

**प्रश्न :–** लिहिल्यानंतर कधीं कुणाला वाचून दाखवितां काय ?

**शिरवाडकर :–** नाहीं. लिहून पूर्ण झाल्यानंतर ती कविता वा कथा फक्त संपादक वाचतात ! मीही तें लेखन वाचत नाहीं. अगदीं प्रसिद्ध झाल्यावर सुद्धां !

**प्रश्न :–** लेखनाच्या ह्या Process मध्यें कांहीं त्रासदायक असा काळ येतो कां ?

**शिरवाडकर :–** कादंबरी, नाटक लिहितांना सुरुवातीचा काळ फार त्रासदायक जातो. पकड यायला वेळ लागतो. ती आली कीं मग जमतें सारें.

**प्रश्न :–** नाटकाचें आराखडे करतां काय ? ते कायम राहतात ?

**शिरवाडकर :–** आराखडे करतो मी. पण तें बदलत जातात. लिहिण्याच्या Process मध्यें मग सर्व गोष्टींचा विचार करावा लागतो.

**प्रश्न :–** निर्मिती पूर्ण झाल्यावरची मनस्थिति ?

**शिरवाडकर :–** मला अतिशय समाधान वाटतें. Relax होतो मी. कांहीं पुरें झाल्याचा आनंद मला बरेंच दिवस पुरतो.

**प्रश्न :–** कधीं Rewriting करावें लागतें काय ?

**शिरवाडकर :–** पूर्ण होईपर्यंत फेरबदल करतो. नंतर नाहीं !

**प्रश्न :–** नाटकाबाबत सुद्धां ?

**शिरवाडकर :–** सहसा नाहीं.

**प्रश्न :–** लेखनिक वगैरे ?

**शिरवाडकर :–** नाहीं. दुसऱ्या कोणाला सांगण्याची कल्पनाच मला शक्य कोटींतली वाटत नाहीं.

**प्रश्न :–** निर्मितीची जी Process आहे त्याबद्दल काय सांगतां येईल!

**शिरवाडकर :–** सांगणें फार कठीण आहे. कारण ती फार गुंतागुंतीची आहे. अनेक गोष्टी त्यांत आहेत. कांहीं वरवरचे, स्थूल स्वरूपाचे विचार सांगतां येतील. पण ते खरें असतीलच असें नाहीं. ही Process सांगतां येते. शब्दांत पकडतां येते असें वाटत नाहीं. आठ आठ, दहा दहा वर्षें एकादा विषय मनांत घोळत असतो. "**कौंतेय**" ह्या नाटकाचा विषय माझ्या मनांत अनेक वर्षें घोळत होता. एक प्रकारचं obsession मग येतं. आणि मग लिहिणं अपरिहार्य होतं.

**प्रश्न :–** कांहीं अपुरे संकल्प ?

**शिरवाडकर :–** नाहीं ! अपुरे लेखन बरेच असते, पण अपुरे संकल्प नाहींत.

**प्रश्न :–** टीकाकारांचा आपल्या साहित्याच्या जडण घडणींत कितपत वांटा आहे ?

**शिरवाडकर :–** मी टीकाकारांचा वा टीकेचा फारसा विचारच कधीं केला नाहीं. त्याचा माझ्यावर वा माझ्या लेखनावर कांहीं परिणाम झाला असें वाटत नाहीं. अनुकूल प्रतिकूल टीकेनें बरें वा वाईट वाटतें. पण थोडा काळ ! पण चर्चा, टीका ह्यांत कधीं पडलो नाहीं. टीकाकारांकडे पाहून माणसें लिहायला लागली कीं, तेल गेलें, तूप गेले अशी अवस्था होते.

**प्रश्न :–** साहित्यविषयक Theoriesचा अभ्यास हा निर्मितीला कितपत आवश्यक वाटतो ?

**शिरवाडकर :–** आवश्यक मुळींच नाहीं.

**प्रश्न :–** आपला आयुष्याकडे पहाण्याचा दृष्टिकोन काय ?

**शिरवाडकर :–** थोडक्यांत कठिण आहे. पण माझ्या राजकीय, सामाजिक मतांबद्दल हा प्रश्न असेल तर "**समाजवाद**" ह्या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या व्यापक तत्वज्ञानावर माझा विश्वास आहे. ●●●



केंद्र सुटलें. आणि मोहिनीचा पतंग भरकटत—भरकटत चालला. त्याच्या प्रवासाला दिशा नव्हती—होती फक्त गति ....
— एक प्रकारची धुंदी--बेहोषी !!

**माझं** लग्न होऊन आबाशास्त्री आपटयांच्या कुटुंबांत मी सून म्हणून गृहप्रवेश केला त्याला आतां बारा वर्षं होऊन गेलीं. अभ्यंकरांच्या वाडयांत पहिल्यापासून आमचं बिऱ्हाड होतं तें नुकतंच मोडलं. पण जवळजवळ एक तप त्या वास्तूंत मी नांदले, त्या वास्तूच्या सुखदु:खांत सहभागी झाले, त्या साऱ्या स्मृति पुसल्या जाणं अगदीं अशक्य आहे. आतां जर कधीं त्या रस्त्यावरून जायचा प्रसंग आला तर एके काळीं त्या वाडयांत नांदलेल्या सुखशांतीच्या पार्श्वभूमीवर आजची ती करुण अवकळा पाहिली कीं माझ्या हृदयांत व्यथेची वेदना मावेनाशी होते. मी शक्यतोवर तो रस्ताच टाळते.

आपटयांच्या घरांत माझे मामंजी आबाशास्त्री, माझे पति प्रभाकर आणि धाकटे दीर सुधाकर असं सगळं पुरुषांचंच राज्य होतं. त्यामुळें गृहकृत्य, नेमधर्म सगळं विचारायला मला पदोपदीं राघवच्या आईंकडे—आमच्या मालकीणबाईंकडे—धाव घ्यावी लागत असे. राघवच्या आईंचा मला मोठा आधार वाटे. आईची माया टाकून मी परघरीं आले पण तिथं मला ही दुसरी आईच मिळाली होती. दुपारीं सगळे पुरुष आपापल्या उद्योगाला गेले कीं माझा मुक्काम राघवच्या आईंकडेच असे. त्यांना देखील माझा इतका ळळा लागला होता कीं मला जरासा उशीर झाला तरी त्यांचा, 'दमयंती, आवरलं कीं नाहीं तुझं ?' हा प्रश्न लगेच कानावर येई ! राघव माझ्या बरोबरीचाच, माझ्याहून अवघ्या चार पांच महिन्यांनीं लहान होता. राघवच्या स्वभावांतलं लाघव मोठं मनोज्ञ होतं. त्याच्या मनांत वैमानिक बनायचं होतं. गोड गोड बोलून आईचं मन वळवून शेवटीं त्यानं आपला हट्ट पुरा केला.

माझ्या लग्नानंतर पांच वर्षांनीं राघवचं लग्न झालं. त्याला बायको चांगली मिळाली होती. मोहिनी जोगळेकर चांगल्या घरंदाज, सुखवस्तु कुटुंबांतली होती. ती राघवपेक्षां वयानं चार वर्षांनी लहान होती. दिसायला फारशी देखणी नसली तरी 'स्मार्ट' होती. अभ्यासांत तर खूपच हुशार होती. मॅट्रिकला तिनं एकदोन बक्षिसं पटकावली होती. लग्न झालं तेव्हां मोहिनीची इंटरची परीक्षा दोन अडीच महिन्यांवर आलेली असल्यानं परीक्षा आटोपून मगच ती राघवकडे जाणार होती. तोवर ती तिच्या सासूबाईंकडे—राघवच्या आईंकडेच रहाणार होती.

माझे मामंजी संस्कृत भाषेंतले विद्वान पंडित म्हणून प्रख्यात होते. मोहिनी त्यांच्याकडे संस्कृत शिकायला रोज येत असे. आमच्या दोघींत चारसाडेचार वर्षांचं अंतर असूनहि आणि दोघींचे स्वभावधर्म भिन्न असूनहि आम्ही चटकन् एकमेकींच्या मैत्रिणी





अनुक्रमणिका

झालो. वहिनी-वन्सं आणि अहोजाहोची उपाधी सोडून एकमेकींना नांवानं, एकेरी उल्लेखानं संबोधूं लागलो. मोहिनीच्या स्वभावाची एक गंमत होती ती म्हणजे तिला मोठेपणाची, श्रीमंती मिरवायची बरीच आवड होती ! 'ये मोहिनी'च्या ऐवजीं 'या मालकीणबाई' असं स्वागत केलं कीं ती खूष व्हायची ! आपण स्कॉलर आहोत याचा देखील तिला गर्व होता. घरांत ठिकठिकाणीं नोकर असावेत, खायची, ल्यायची चंगळ असावी, नवऱ्यानं, सासूनं, आपलं पदोपदी कौतुक करावं अशी तिची अपेक्षा असायची. आपण या वाड्याची मालकीण, आपल्या नवऱ्याला बारा पंधराशें रुपये पगार मिळतो याचा तिला मोठा अभिमान वाटे. तिच्या नशिबानं राघव तिची सारी हौसमौज पुरवीत होता. सासू तर अगदींच गरीब स्वभावाची होती. राघवच्या आईना 'इतकी सुखासीन वृत्तीची चटक बरी नव्हे' असं वाटे पण त्या मोहिनीला कांहीं बोलत नसत. मोहिनीनं स्वतःच्या दिमतीला एक दहाबारा वर्षांची चुणचुणीत पोरगी ठेवलेली होती. मोहिनी झोपून उठली कीं त्या मुलीनं तत्परतेनं तिच्यापुढें सपाता आणून ठेवाव्या, ती मुखमार्जनासाठीं वॉश बेसीनकडे गेली कीं लगेच ब्रशवर टूथपेस्ट लावून तो अदबीनं तिच्या हातीं द्यावा, दोन बादल्या गरम पाणी, साबण, टॉवेल, तळपाय घासायची 'वज्री', कपडे अशी सर्व जय्यत तयारी करून मग तिनं 'वहिनीसाहेबांना' स्नानाला बोलवावं अशी सारी तैनात करून घ्यायची मोहिनीला हौस होती ! तिचे रोजचे कपडे देखील भट्टीचे असत. ती नुसती जवळून गेली तरी 'यार्डले' च्या उंची 'लव्हेंडर'चा सुगंध मागे दरवळत रहात असे. एवढसं कुठे चार पावलं जायचं तरी तिला टॅक्सी नाहींतर रिक्षा लागे ! तऱ्हेतऱ्हेच्या चपला, सॅन्डल्स, पर्सेस आणि सर्व पेठांच्या सर्व नमुन्यांच्या साड्या तिनं सोसासोसानं खरेदी केल्या होत्या. एका वेळीं निदान डझनभर ब्लाउझेस ती शिंप्याकडे शिवायला टाकत असे ! मोहिनीची ही चैनीची आणि वैभव प्रदर्शनाची अनिवार हौस सोडली तर एरवी ती खरोखरच गुणी होती.

इंटरची परीक्षा झाल्यावर लगेच ती राघवकडे गेल्यानं तिची माझी गांठभेट होईनाशी झाली. त्यानंतर दोन अडीच वर्षांत ती आणि राघव पांचसांत वेळां घरीं येऊन गेले पण त्या भेटी धांवत्या; त्यांत मोहिनी माझ्या वांटयाला कितीशी येणार ? अद्याप तिला मूलबाळ झालेलं नव्हतं. त्यावरनं मी तिला एकदा चिडवलं तेव्हां ती म्हणाली—

"पहा बाई ! एवढी घाई कशाला हवीय ? अग दमयंती, हे मजेचे दिवस आयुष्यांत एकेकदाच येतात. तीनचार वर्षं तरी मोकळेपणीं राहूं दे कीं मला. मग नंतर जन्मभर आहेच हातांत पाळण्याची दोरी आणि जगातें उद्धारी !" नशिबांत पुढें काय वाढून ठेवलंय तें माहित असतं तर मोहिनीनं त्या विषयाची अशी थट्टा केली नसती. मोहिनीच्या पोटीं राघवच्या वंशाचा अंकुर रुजला असता तर कदाचित् पुढचा सगळाच अनर्थ टळला असता. पण नशिबाची रेघ अशीच नको त्या मार्गानं जायची होती ना ! एका अशुभ दिवशीं राघवचं विमान कोसळलं आणि त्याच्या अपमृत्यूनं या दोन अभागी अबलांवर आकाशच कोसळलं. मोहिनी इतकी कोवळ्या, तरुण वयाची मुलगी ! राघवच्या मृत्यूनं तिचं उमलतं आयुष्य करपून, सुकून जाणार होतं. राघवच्या आईनाहि साऱ्या जगांत एकमेव आधार म्हणजे राघव. त्या दोघींचीहि सारी सोन्याची द्वारका एका खांबावर उभी होती. तो खांब ढांसळला आणि तें सोनेरी सुखस्वप्नहि मोडून, फुटून गेलं. राघवच्या आईहूनहि परिचयाच्या प्रत्येक व्यक्तीला मोहिनीची जास्त कणव येत होती. सहाजिकच होतं तें. माझं हृदय देखील तिच्यासाठीं तिळतिळ तुटत होतं.

राघवच्या मृत्यूपूर्वी कांहीं दिवस मोहिनीचे वडीलहि वारलेले होते. तिचे दोन्हीं भाऊ अजून लहान, शिकाऊ विद्यार्थीच होते. अशा वेळीं मोहिनीला आधार द्यायला गांवांतच रहाणारा तिचा चुलत मामा गोपीनाथ पुढे आला आणि तिथूनच पुढच्या मोठ्या अनर्थ परंपरेला सुरुवात झाली. मोहिनीचा हा मामा महा बिलंदर, कृष्ण कारस्थानी, विषयी होता. गांवांत त्याच्या



—सौ. शकुंतला गोगटे

कापड दुकानाच्या तीन शाखा मोठ्या भरभराटींत चालूं होत्या. त्याच बरोबर त्याच्या संसाराच्याहि एक मुख्य आणि अनेक उपशाखा गांवांत नांदत होत्या ! ('बीनबोभाट' मात्र नव्हे, कारण अशा खमंग, चविष्ट गोष्टींचं चर्वित्चर्वण आणि बोभाटा हा होणारच !) वेळींअवेळीं अभ्यंकरांच्या त्या पवित्र वास्तूंत या अपवित्र इसमाची पायधूळ झडूं लागली. हा 'नाथमामा' आला कीं राघवच्या आईच्या कपाळाला आठी पडे. पण काय करतात बिचाऱ्या ! मोहिनीच्या सुखासीन वृत्तीची नाडी धूर्त गोपीनाथनं बरोबर ओळखली होती. तो हळूं हळूं मोहिनीला दीक्षा देत होता.

"सासू किती झालं तरी परकी. लेकासारखी तुझी माया तिला कशी वाटणार ? शिवाय म्हातारी आतां कितीशी जगणार ? तुझं मात्र उभं आयुष्य जायचंय. या जगांत माणसाचा पैशावांचून निभाव लागत नाहीं. ही 'माया' जवळ असली तर सारं जग विचारपूस करतं नाहींतर कुणी कुणाचा नाहीं. राघवच्या इंशुअरन्सचे पैसे तुझ्या नांवावर आहेत. त्या बाबतींत मन खंबीर ठेव. पैन् पै तुला मिळाली पाहिजे" असं तो तिला सांगे. तिच्या समोर घरच्या नोकरांना ताकीद करी.

"वहिनीसाहेब इथल्या खऱ्या मालकीण आहेत. त्यांची मर्जी संभाळण्यांतच तुमचं खरं कल्याण आहे. माणसानं उगवत्या सूर्याकडे बघावं !" यातला गर्भितार्थ असा असे कीं राघवच्या आईचा मान राखण्यापेक्षां मोहिनीला मान दिला तरच त्यांचा निभाव लागेल ! वहिनीसाहेब,






मालकीण या जादूच्या शब्दांनीं मोहिनी गोपीनाथवर बेहद्द खूष व्हायची ! अगदी त्याच्या अंकित होऊन त्याच्या तालावर नाचायची !

राघवच्या विम्याची रक्कम बरीच मोठी, जवळजवळ लाखाच्या घरांतली होती. एवढा पैसा अचानक हातीं आल्यानं मोहिनीचं मस्तक फिरून गेलं ! त्या लक्ष्मीच्या संपर्कानं तिचं मूळचं जरा तरी द्रवणारं हृदय एखाद्या अभेद्य तिजोरी-सारखं कठिण बनलं. कुठल्याच सुविचाराचा किंवा कोमल भावनेचा तिथं शिरकाव होईना कीं त्या हृदयांत काय दडून राहि-लंय् याचा कुणाला थांग लागेना. मोहिनी जास्त जास्त गोपीनाथच्या आहारीं जात होती. दोन अडीच वर्षं संसारसुखाची रुचि चाखल्यानंतर मोहिनीला भरल्या ताटा-वरून उठावं लागलं होतं. तारुण्यसुलभ भावनांचा कोंडमारा तिला असह्य वाटत असेल हें साऱ्यांनाच जाणवत होतं. गोपीनाथसारख्या माणसाशीं तिची वाढती घसट त्या दृष्टीनं जास्तच चिंताजनक वाटत होती. पण मोहिनीला कांहीं बोललं कीं ती आम्हांलाच वेड्यांत काढत होती. 'नाथमामा माझ्याहून दुप्पट मोठा आहे वयानं. तुम्हाला बोलवतं तरी कसं असं ? असं ती उलट आम्हांलाच विचारी. तिच्या जीवनांतल्या त्या तशा अत्यंत आणी-बाणीच्या काळांत गोपीनाथसारखा लंपट, दुराचारी माणूस तिच्याभोंवतीं रात्रंदिवस वावरतोय् ही गोष्ट बरी नव्हती. पण उघड्या डोळ्यांनी खड्ड्यांत पडणाराला कसं वांचवणार ? गोपीनाथ तिच्याभोंवतीं कोळ्यासारखं आपलं जाळं विणीत होता आणि मूर्ख मोहिनी त्या जाळ्यांत कळून-सवरून स्वत:ला गुरफटूं देत होती ! बायकांना वश करून घेण्याचा कसला तरी अजब मोहिनीमंत्र त्या धूर्त माण-साला सांपडलेला होता खास ! गोपीनाथ-वरून रोज मोहिनीची आणि राघवच्या आईची भांडणं होऊं लागलीं. परिणाम असा झाला कीं एक दिवस मोहिनी घरांतून नाहीशी झाली !

प्रथम आम्ही सगळेच घाबरलो होतो पण लगेच खरी गोष्ट आम्हांला कळून चुकली. मोहिनीनें सारा डाव मोठ्या चातुर्यानं रचला होता. गोपीनाथनं तिच्या-साठीं गांवाबाहेर एका बाजूला एक बंगला भाड्यानं ठरवला होता. सासूच्या नकळत अभ्यंकरांच्या वाड्यांतलं वेचक मूल्यवान् सामानसुमान नोकरांना वश करून घेऊन तिनं एका रात्रींत गुपचूप हलवून त्या सामानासह मोहिनी तिकडेच जाऊन राहिली होती. तिच्याविषयीं रोज नव्या बातम्या लोक सांगत होते. त्या ऐकतांना वादळांत सांपडून गोते खाणाऱ्या असहाय्य पर्णासारखी आमच्या मनांची अवस्था होत होती. मला पाठच्या भावासारख्या असणाऱ्या राघवची ही धर्मपत्नी अधर्माच्या गलिच्छ रस्त्यावरून राजरोजपणे चालत होती ! अभ्यंकरांच्या थोर कुळाचं नांव लावणारी ही सून साऱ्या मंगल बंधनाच्या सीमा झुगारून किळसवाण्या उपभोगाच्या कैफांत झिंगत होती ! आणि सर्वांत विचित्र दैवगति म्हणजे हें सारं राघवच्याच पैशावर चाललेलं होतं !!

मोहिनी घर सोडून गेली त्या दिवशीं राघवची आई फार फार रडली ! बिचारी दुर्दैवी माउली ! राघवच्या मृत्यूनं उजाड झालेलं त्या एकाकी, असहाय्य वृद्धेचं जीवन मोहिनीच्या पातकानं पुरतंच उध्वस्त झालं होतं. प्रथम सर्वांना मोहिनीची अतीव करुणा येत होती. पण राघवच्या मृत्यूनं मोहिनचं कसलंच सुख कमी झालेलं नव्हतं उलट तिच्या साऱ्या चैनी अधिकच मुक्तपणें चालूं होत्या ! दोन अडीच वर्षांसाठीं अभ्यंकरांच्या घराण्यांत उपऱ्या-सारखं येऊन एका भोगलालस, कुलकलं-किनी स्त्रीनं त्या बिचाऱ्या वृद्ध मातेचं अक्षरश: घरादारासकट सर्वस्व हिरावून नेलं होतं ! पण राघवच्या आईची धन्यता खरी ! एक दिवस त्या मला म्हणाल्या—

"दमयंती, राघवच्या बायकोबद्दल थोडं बोलायचंय तुझ्याशीं. बोलूं नये ते बोलणं नशिबी आलंय. इतके दिवस माझ्या सोन्याच्या तुकड्याभोंवतीं गुंडाळलेली होती म्हणून ही चिंधी मी जपली. आतां माझं सोनं हरवलं तरी अभ्यंकरांच्या मोठ्या कुळवंशाला डाग लागूं नये म्हणून ती चिंधी धूत बसणं मला भाग आहे. माझ्यासाठीं एक गोष्ट करशील का दमयंती ?"

"काय करूं मी राघवची आई ?"

"तूं तिला जाऊन भेट. तिला तसं रहावत नसलं तर तिला म्हणावं तूं खुशाल



तुमचें सौंदर्य साकार करण्याचं माझ्या आयुष्यांतलं सर्वांत मोठं स्वप्न आज साकार झालं. धन्य झालो मी !



अनुक्रमणिका








अनुक्रमणिका

रीतसर दुसरं लग्न कर, पुन्हां संसार थाट. आतां काळ बदललाय तेवढं समजतं मला. वाटलं तर सगळं दुःख आंतल्या आंत गिळून माझी मुलगी समजून मी तिचं कन्यादान सुद्धां करीन. पण तिला म्हणावं, माझ्या राघवनं लक्ष्मीपूजनाच्या वेळीं तांदळावर त्याच्या अंगठीनं तिचं 'सीता' हें नांव कोरलंय त्या नांवाची तरी लाज बाळग ! अब्रूसाठीं अग्निदिव्य केलं नाहींस तरी घरादाराच्या अब्रूला अशी काडी लावूं नकोस ! ज्याचं अन्न खातेस त्या अन्नदात्याच्या आत्म्याला तरी शांति लाभूं दे ! दमयंती, काय सांगूं तुला ? मुलीच्या जातीवर केवढी जबाबदारी असते! दोन कुळांचा गौरव तिच्या हातांत असतो. सीता एकटी पाप करेल पण त्या कृत्यानं तिच्या सासरमाहेरच्या बेचाळीस पिढ्या नरकांत जातील ! अभ्यंकरांचं आणि जोगळेकरांचं अशी दोन नामवंत घराणीं बरबाद होतील ! सांगशील तिला एवढं?"

दुःखावेगानं मला शब्दच फुटेना ! घराण्याच्या लौकिकासाठीं ती थोर मनाची, जुन्या वळणाची करारी स्त्री काळजावर धोंडा ठेवून आपल्या सूनेचा पुनर्विवाह करायला तयार झाली होती !! मोहिनी रहात असे त्या बंगल्यावर मी दोनदां जाऊन आले पण तिची माझी भेट झाली नाही. ती म्हणे 'विश्रांती'साठीं उटकमंडला गेली होती ! बरोबर अर्थात् गोपीनाथ होताच !

मोहिनीनं विम्याच्या पैशापैकीं एक पैहि राघवच्या आईला दिली नव्हती. घरभाड्याचे पंचवीस रुपये आम्ही त्यांना देत होतो. मोहिनी म्हणे, 'तेवढी सूट मी त्यांना दिलीय हेंच पुष्कळ झालं !' मोहिनीच्या त्या माणुसकीला सोडून वागण्याचा मला असा संताप येई कीं वाटे सत्ता असती तर मी तिच्या दहा मुस्कटांत मारून एक मोजली असती ! आम्हा परक्या माणसांना जी कणव होती ती मोहिनीच्या सोन्याच्या पत्र्यानं मढवलेल्या दगडी काळजाला नव्हती. मोहिनीला पैशाची हाव असली तरी ती अशा पराकोटीची असेल हें मला माहित नव्हतं.

ज्या राघवच्या आईनी त्याला जिवापाड संभाळून मोठं केलं, नवऱ्यामागे त्याच्यासाठीं सर्व आयुष्य वेचलं त्या राघवच्या पैशावर त्यांची कसलीच सत्ता नसावी आणि अल्पकाळासाठीं राघवच्या आयुष्यांत डोकावून गेलेल्या उपऱ्या मोहिनीला त्याचं सर्वस्व मिळावं ही गोष्ट माझ्या मनाला पटत नव्हती. एक दिवस हे आणि मी बोलत बसलो होतो. हे वकील असल्यानं मी ह्यांना विचारलं—

"राघवच्या आईनं असं लाचारीनं राहिलेलं बघवत नाहीं मला ! या अभ्यंकरवाड्यावर, राघवच्या पैशावर त्यांची कांहींच सत्ता नाही कां ? त्यांच्यावर भयंकर अन्याय होतोय हा ! कायद्यांत कांहींच तरतूद नाहीं का याची ?"

"असं कुणी सांगितलं तुला ? हा वाडा तर वडिलोपार्जित आहे. राघव होता तेव्हांसुद्धां त्याच्या आईची वाड्यावर निम्मी मालकी होती. आणि राघवची जी स्वकष्टार्जित मिळकत आहे ना, त्यावर सुद्धां छपन्न सालच्या कायद्याप्रमाणें त्यांचा मोहिनींइतकाच निम्मेनिम हक्क आहे. बायको आणि आई दोघीं सारख्याच हिस्सेदार ठरतात."

"असं जर आहे तर मग सध्यां आपल्याला भुर्दंड पडला तरी चालेल पण तुम्ही राघवच्या आईंना त्यांच्या हक्काचं जें आहे तें सर्व कोर्टातून मिळवून द्या ! स्टँपच्या खर्चासाठीं यावेळीं माझ्या गोटपाटल्या मोडाव्या लागल्या तरी चालेल."

"दमयंती, वेडी आहेस तूं. गोठपाटल्या मोडण्याइतकी वेळ येणार नाहीं. माझ्या मनांत देखील ही गोष्ट येत होती. तुझा दुजोरा मिळाला हें बरं झालं. पण मला वाटतं एक उपाय आपण आधीं करून पहावा" हे माझ्याकडे कौतुकानं बघत म्हणाले.

"तो कोणता ?" मी विचारलं.

"तूं एकदां त्या मोहिनीला भेटून तिचं मन वळवता येतं का तें पहा. नाहीतर मग कोर्ट कचेरी आहेच. शक्यतोवर या गोष्टी कोर्टाच्या चव्हाट्यावर यायला नकोत."

राघवच्या आईसाठीं शेवटी मी मोहिनीला जाऊन भेटले. राघव गेल्यानंतर तिनं पांढरीं पातळं नेसायला सुरुवात केली होती. अजूनहि चार लोकांत शोकप्रदर्शनासाठीं ती शुभ्र वस्त्रंच वापरीत होती ! तिच्या दांभिकपणाचा मला तिटकारा वाटत होता. शुभ्र वस्त्रांऐवजीं तिनं शुद्ध, निष्कलंक शील संभाळलं असतं तर घृणेनं बाजूला वळणारी हीच मान तिच्या पायाशीं आदरानं झुकली असती ! सारा राग गिळून मी तिची मनधरणी करून पाहिली. पण ती मला निर्लज्जपणानं म्हणाली —

"हे बघ दमयंती, मी पुरुष असते तर या परिस्थितीत मी दारूच प्यायला लागले असते ! वैधव्याचं दुःख विसरायला मला पैसा हीच जशी दारू वाटते ! पैशानं मी हवं तें सुख विकत घेऊं शकते. मला पैसा पाहिजे. खूप खूप पैसा पाहिजे. राघवच्या पैशावर फक्त माझा एकटीचाच सर्वस्वी हक्क आहे असं नाथ म्हणतो. त्याला माझ्या हिताची खरी कळकळ आहे. नाथवर माझा पूर्ण विश्वास आहे ! तुझ्या प्रभाकररावांना म्हणावं फुकट पैसा वाया घालवायचा असला तर खुशाल फिर्याद लावा !"

नाथ म्हणतो ! नाथवर विश्वास ! 'नाथ मामा'चा आतां 'नाथ' झाला काय? अरे वा रे नाथ ! मोहिनीनं सारी लाजलज्जा गुंडाळून ठेवली होती. ती माझं सांगणं थोडंच मानणार ? अशा बाईपुढें मी तरी काय बोलणार ? म्हणतात ना, 'नंगे से खुदा भी डरता है !' तिच्या पुढून मी तिरस्कारानं उठून गेले.

मोहिनीवर फिर्याद लावायचं आम्ही पक्कं ठरवलं होतं पण तेवढी वेळच राघवच्या आईनं येऊं दिली नाहीं. एक दिवस कुणीसं त्यांना येऊन सांगितलं की मोहिनीला गोपीनाथपासून दिवस गेलेले आहेत तेव्हां त्यांना इतका मोठा धक्का बसला कीं त्या धक्क्यानं त्यांची वाचाच गेली ! त्यानंतर त्यांनीं अंथरूण धरलं ते तीनचार महिन्यांत त्यांचं देहावसानच झालं ! अभ्यंकरांचं महान् पवित्र घराणं त्या अमंगल क्षणीं कायमचं नष्ट झालं ! राघवच्या आईचं हें असं मरण झाल्यानं मोहिनीच्या पातकांत नवी भरच पडली होती. त्या कुलकलंकिनीनं त्यांचा जणूं जीवच घेतला होता !

मोहिनीला खरोखरच मूल झालं होतं ! तिनं पुरतंच ताळतंत्र सोडलं होतं ! गोपीनाथचे श्रीमंत, उल्लू दोस्त तिच्या बंगल्यावर चकरा मारतात, इतकंच नव्हे तर प्रत्यक्ष गोपीनाथाचा मुलगाच तिच्या नादीं लागलाय अशा किळसवाण्या वार्ता ऐकूं येत होत्या. वुडत्याचा पाय खोलांत तशी तिची स्थिति झाली होती. राघवची आई रहायची ती जागा मोहिनीनं एका निर्वासित कुटुंबाला भाड्यानं दिली होती. ती माणसं नुसती गलिच्छच नव्हती तर अत्यंत अनीतिमान् होती. ज्या वास्तूंत एके काळीं सुखशांति नांदली तिथं अवकळा नांदायला आली होती. जिथं देहाची शुचिर्भूतता राखली जाई तिथं देहविक्रय चालूं होता ! देवाच्या पूजेऐवजी पैशाची पूजा होत होती ! उदवत्ती–कर्पूराचा सुगंध दरवळला तिथं मद्यमांसाचा दर्प भरून राहिला होता ! गणपतीच्या आरतीच्या घंटानादाऐवजी तिथं गणिकांचे पैंजण निनादत होते ! माझे मामंजी कर्मठ, निष्ठावंत ब्राह्मण होते. आमचं घराणं नेमधर्म पाळणाऱ्या श्रद्धाळू माणसांचं होतं. हा असला शेजार आम्हांला मानवेना. त्या पवित्र वाड्याची ती विटंबनाहि पहावेना. जुनं भाडं आहे हा फायदा देखील नजरेआड करून आम्ही मुकाट्यानं घर बदललं.

☆ ☆ ☆

आमच्या नव्या बिऱ्हाडांत एक दिवस हे, मी आणि मामंजी निवांतपणे बोलत बसलो होतो. मी मामंजींना म्हटलं,

"मामंजी, तुम्ही नेहमी म्हणता कीं या जगांत जें जें आहे तें सारं महाभारतांत आहे आणि महाभारतांत जें नाही तें जगांतहि नाही ! मग माझ्या एका कोड्याचं उत्तर महाभारतांत सांपडूं शकेल कां ?"

"निस्संशय ! महाभारताची थोरवी दाखवतोच आज तुला ! काय आहे तुझा कूट प्रश्न, सांग बघूं ?"

"मामंजी, मोहिनीला–राघवच्या बायकोला–तुम्ही ओळखता. ती तुमची थोडीशी शिष्या पण आहे. ती मुलगी मुळांत वाईट नव्हती. चांगल्या कुळांत ती जन्मली, थोर कुळांत आली. तिच्या मनावर चांगले संस्कार घडलेले होते. मग आज ती एवढ्या अधोगतीला कशी गेली आहे ? तिच्यासारख्या सुशिक्षित, सुसंस्कृत मुलीला अधर्म कळत नाही असं मी कसं म्हणूं ? मग ती कळून सवरून असा दुराचार कशी करूं शकते ? एका चांगल्या व्यक्तीचा असा भयंकर अध:पात कसा होतो मामंजी ?"

"प्रभाकर, तुझी वायको वरीच आहे कीं ! सासऱ्याची परीक्षा घेतीय बघ !" मामंजी ह्यांना विनोदानं म्हणाले, मी जीभ चावून म्हटलं–

"तसं नव्हे मामंजी ! मी आपली परीक्षा ती काय घेणार ? उलट मलाच आपल्याकडून गुरुपदेश हवा आहे."

"अस्सं ! दमयंती, फार सुंदर प्रश्न विचारला आहेस तूं. त्याचं उत्तर मी तुला महाभारतांतूनच साधार देतो, पण तें समजायला आणि पटायला तुझ्या अंतःकरणांत ईश्वराविषयीं श्रद्धा असली पाहिजे. भजनपूजनापेक्षां या श्रद्धेचं महत्त्व जास्त आहे."

"मामंजी, देवावर तर माझी पूर्ण श्रद्धा आहेच पण तुमच्या शब्दावरहि ती तशीच आहे."

"ऐक तर मग. आपण माणसं जन्मापासून अंतापर्यंत चांगलीं वाईट कर्मं करीत रहातो. पण हे 'आपण' म्हणजे शेवटीं कोण ? आपण म्हणजे हा आपला देह ? छे, हा तर मातीचा नाशिवंत गोळा ! मग 'आपण' कोण ?"

"आपण म्हणजे आपला आत्मा" हे चटकन् म्हणाले.

"बरोबर. आणि आत्मा म्हणजेच शेवटीं परमात्मा ! आत्मरूप हें परमेश्वराचंच रूप ! आपण कर्म करतो पण त्याचा कर्ता करविता असतो तो हा आपला हृदयस्थ ईश्वर. माणूस चांगलं किंवा वाईट कृत्य करतो तें या आंतल्या चैतन्याच्या प्रेरणेनं. चांगली किंवा वाईट बुद्धी हा हृदयस्थ ईश्वरच माणसाला देतो."

## किंचितिका—

हॉलीवुडच्या एका नटीला
म्हणे वेड लागले आहे
कारण तिने नेहमी अंगभर
कपडे घालायचे ठरविले आहे.

• •

रूपसुंदरी म्हणुन एकदां
गौरव मी केला तुझा
एवढे कशी विसरलीस तेव्हां–
चष्मा हरवला होता माझा.

• •

एका नटीने ड्रेस शिवला
मस्त 'एअर कंडीशन्ड.'
तेव्हां पासून उंचावलीय
तिची 'मनोकंडीशन'.

• •

एका मंत्र्याच्या बायकोस
त्याच्या एका मित्राने
पळवून नेले.
मंत्री रागाने लाल झाला,
आणि तत्काळ त्याने एक–
निषेध खलिता पाठवून दिला.

—अनिल सोनार

"पण मग मामंजी, हा प्रत्यक्ष ईश्वर एखाद्याला अधर्माला काय म्हणून प्रवृत्त करतो ? देव आपल्याला अशी वाईट प्रेरणा कां बरं देतो ?"

"आपण त्याच्याकडे सद्बुद्धीला आवाहन करत नाहीं म्हणून."

"म्हणजे कसं मामंजी ?"

"सांगतो. नीट समजवून घे. दमयंती, तूं रोज तुझ्या मुलांना देवापुढे 'शुभं करोति'



अनुक्रमणिका

ही प्रार्थना करायला लावतेस तेव्हां तूं त्यांना असें म्हणायला शिकवतेस ना, कीं 'देवा आम्हांला चांगली बुद्धि दे !' हेंच तें सद्बुद्धीचं आवाहन ! वारंवार चुकणाऱ्या, पदोपदी घसरणाऱ्या आपण दुर्बल माणसांनीं तर हें आवाहन पुनःपुन्हां करायला हवं ! दुर्बुद्धि सुचली कीं माणसं घसरतात पण पश्चात्ताप झाला तर सुबुद्धि आठवून तीं पुन्हा सावरून नीट मार्गी लागतात. पण कांहीं पापाचरण करणारीं माणसं पश्चात्ताप न करता त्या पापाचं समर्थन करूं पहातात. जगापेक्षांहि ती माणसं आपल्या स्वतःशींच जास्त प्रतारणा करतात ! मनाशीं पापाचं समर्थन करणं ही पातकी माणसांची सहज प्रवृत्ति असते ! तसं समर्थन करून मन तयार झालं कीं अशीं माणसं निःशंकपणें नवीं पापं करत रहातात. स्वतःला फसवणारीं हीं माणसं नकळत दुर्बुद्धीला आवाहन करतात. त्यांचा हृदयस्थ ईश्वरहि मग त्यांना दुर्बुद्धीच देतो ! तुला एक महाभारतातला प्रसंग सांगतो. पांडवगीतेंत हें वर्णन आलेलं आहे. कौरवांच्या दरबारांत भगवान श्रीकृष्ण आलेले असतात. धृतराष्ट्र, भीष्मादिकांपासून सर्व त्यांना वंदन करतात पण एकटा दुर्योधन मात्र तसाच स्वस्थ बसून रहातो तेव्हां विदुर त्याला विचारतात–

"बा सुयोधना, या महात्म्याला नमन करायची बुद्धि तुला होत नाहीं कां ? असं अधर्माचरण काय म्हणून करतो आहेस तूं ?" त्यावर दुर्योधनानं दिलेलं उत्तर मोठं मार्मिक, बहारीचं आहे. तो म्हणतो,

'जानामि धर्मं नच मे प्रवृत्तिः जानाम्य धर्मं नच मे निवृत्तिः ।
केनाऽपि देवेन हृदिस्थितेन यथा नियुक्तोऽसि तथा करोमि ।।'– म्हणजे 'मला धर्म कळतो, पण तिकडे माझ्या मनाची प्रवृत्ति होत नाही; जगाच्या दृष्टीनं अधर्म कोणता आहे तोहि मला उमगतो पण त्यापासून माझं मन निवृत्त होत नाहीं ! माझ्या हृदयांत वास करणारा कुणीसा ईश्वर मला जशी प्रेरणा देतोय्, तसं माझं आचरण घडतंय !' – दुर्योधनाच्या मनांत पांडव द्वेष होता त्यामुळें स्वतःची सद्सद्विवेक बुद्धी तो घालवून बसला होता. तो देवापाशीं दुर्बुद्धीच मागत होता ! दमयंती, मोहिनीचा अधःपात होतोय कारण स्वतःच्या पापाचं समर्थन करून, स्वतःच्या मनाला फसवून हृदयस्थ ईश्वरापाशी ती नकळत दुर्बुद्धीलाच आवाहन करते आहे ! आपण कळसूत्री बाहुल्यांचा सूत्रधार तो ईश्वर आहे. आपल्या कर्माचा कर्ता करविता, आपला बोलविता धनी तोच आहे. पण म्हणून स्वतःची प्रतारणा करून त्या आत्मरूप ईश्वराचा उपमर्द करून कसं चालेल ? तुला आणखी एक उदाहरण देतो. एवढे मोठे रामदास स्वामी पण त्या 'समर्था'ला सुद्धा देवाला आवाहन करून पुनःपुन्हां विनवावं लागलं कीं–

'शक्ति नाही, बुद्धि नाही, विद्या नाही विवेकिता
नेणता भक्त मी तूझा, बुद्धि दे रघुनायका!
तुझा मी टोणपा झालो कष्टलो बहुतापरी
सौख्य तें पाहता नाही, बुद्धि दे रघुनायका !'

–बुद्धि दे रघुनायका ! समर्थांनीं सुद्धा ईश्वराला अशी अनन्य भावानं साद घातली मग आपण असमर्थ मानवांनीं तर आपल्या हृदयस्थ ईश्वराला सारखं पाचारून विनवलं पाहिजे कीं आम्हाला सद्बुद्धि दे. वाईटाची, पापकर्माची बुद्धि कधींहि देऊं नकोस !"

मामंजींची रसवंति ऐकतांना मी अष्टांगीं तृप्त होत होते ! इतके दिवस मी मुलांना देवापुढे 'चांगली बुद्धि दे' म्हणायला लावत होते तेव्हां वाडवडिलांनीं लावलेलं वळण मी नकळत आचरत होते इतकंच. त्यांतला खरा अर्थ मला उमगलेला नव्हता! मी दासबोधाचीं पारायणं केलेलीं असूनहि मला खरा बोध झालेला नव्हता ! 'चांगली बुद्धि दे' हें फक्त लहान मुलांनींच म्हणायचं असतं अशी माझी वेडी समजूत होती ! पण आतां मी तें सारं त्या मागचा अर्थ कळून करते. मुलांप्रमाणें मी पण देवाची प्रार्थना करताना रोज म्हणते,

"देवा, मला सदैव चांगली बुद्धि दे ! आणि देवा, मोहिनीला पण तूं अजून सद्बुद्धि दे ! तिची अधोगति अजून तरी थांबव. तिला त्या गर्तेतून वर काढ. एका चांगल्या घराण्यांतल्या चांगल्या मुलीचा हा अधःपात बघवत नाहीं मला !"

माझी ही अंतःकरणापासून केलेली प्रार्थना मोहिनीच्या हृदयस्थ ईश्वराला कधीं ऐकूं जाईल कां ? कां हें आवाहन ज्याचं त्यानंच करावं लागतं ? तेंहि शेवटीं तो ईश्वरच जाणे ! पण मी मात्र माझी श्रद्धा कधीं ढळूं देणार नाही. माझ्या बाजूनं हें आवाहन मी नेहमी करीतच राहीन !

●●●

## साभार पोंच

### मॅजेस्टिक बुक स्टॉल प्रकाशनें

**चौकोनी कुटुंब**
लेखक : शामराव ओक
मूल्य : ३ रु.

**चोर सोडून संन्यासी**
लेखक : हिराकांत कलगुटकर
मूल्य : २ रु.

**तुमचे ग्रह तुमच्या इच्छा आकांक्षा**
लेखक : द. शं. केळकर
मूल्य : २ रु. ५० पै.

**तुमचे ग्रह तुमचा परिवार**
लेखक : द. शं. केळकर
मूल्य : २ रु. ५० पै.

**आंधळी**
लेखिका : शांता शेळके
मूल्य : २ रु. ५० पै.

**मर्दाची कहाणी**
लेखक : यशवंत रांजणकर
मूल्य : ३ रु.

**विद्युत् विजेता–टेस्ला**
लेखक : शं. ना. नवरे
मूल्य : ३ रु.

### व्होरा अँड कं. प्रकाशनें

**मोत्यांचें पीक**
लेखिका : सौ. मृणालिनी देसाई
मूल्य : २ रु.

**श्रीरामकृष्णाचे लीलासहचर**
लेखक : वा. पु. दामले
मूल्य : ३ रु. ५० पै.

**हिंदी महाकाव्यें**
लेखक : शि. शं. आपटे
मूल्य : २ रु.

**रागिणी**
लेखक : मनोहर लाटे
मंगल प्रकाशन, पुणें २
मूल्य : ४ रु.

**सुकन्या**
लेखक : यशवंत रांजणकर
योजना प्रकाशन, अलिबाग, कुलाबा
मूल्य : ४ रु.

**वात्सल्य**
लेखक : पंडित गुरव
विकास प्रकाशन, कोल्हापुर.
मूल्य : ३ रु.

**भाऊबीज**
लेखक : पंडित गुरव
विकास प्रकाशन, कोल्हापूर
मूल्य : ५० पै.

●●●


SUNLIGHT
Soap
सनलाइट साबण
नव्या फॉर्म्युलाचा
सनलाइट
अधिक चमकदार धुलाईसाठीं






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



# खुणा

प्रा. गजमल माळी

**फार** पूर्वीची ही गोष्ट. या डोंगराच्या पायथ्याशी आज वसलेल्या या लेणापूर गांवीं घडली. गांव तसा जुना आहे. त्याला हे नांव पूर्वी नव्हतं. लेणापूर हे बौद्धकालीन नांव असावं. पण पूर्वी येथें कांहीं टोळ्या स्थायिक झाल्या. तेव्हापासून या पांढरीवर वसति झाली. ती आजतागायत टिकून आहे. गांव जुनें, नांव नवें असा त्याचा इतिहास. या परिसरांत ज्या घटना घडल्या त्याच्या आठवणी येथील मातीनें वेंचून ठेवल्या आहेत. आज आपण या माळावरील मूठभर माती हातांत घेतली कीं, तिचा वेगळा असा गंध येतो. जुन्या आठवणींनीं ही माती चिंब भिजली आहे. ऊन्हाची घार ओघळली कीं, तिचा सुकावा होतो. पण त्यांतूनहि आठवणी जीव धरून असतात. येथे जीं पुरातन दैवतें आहेत तीहि प्राचीन काळांतील आहेत. दगडांच्या देवांना संरक्षण मिळावें म्हणून मातीच्या भितींनीं देऊळ बांधले जाते, पण येथें कांहीं देव अजूनहि उन्हातान्हांत तसेंच पडून आहेत. जवळपास अनेक दगड आहेत. या साऱ्या दगडांत देवाचाहि एक दगड पडलेला दिसतो. त्याला शेंदूर फांसलेला असतो व म्हणूनच तो इतर दगडांतून वेगळा दिसतो. शेंदूर हीच देव ओळखण्याची खूण, इतर खुणा असतील, पण काळाच्या प्रवाहांत त्या बुजून गेल्या आहेत.

वेशीच्या जवळ गेलांत, तर आपल्याला एक उभट दगड लागेल. दगड तसा सरळ आहे. दगडाची व्यवस्थाहि मूळ स्वरूपाची आहे. मानवी शस्त्रांचा संस्कार त्या दगडावर झालेला नसल्यानें त्याचें स्वाभाविक रूप आपल्याला दिसते. या दगडावर मानवी संस्कार झाला असता तर मानवाच्या जीवनाचें त्या काळांतील रूप कोणतें असावें याचा कयास बांधतां आला असता.

या दगडाचें असें स्वाभाविक रूप टिकण्याचे आणखीहि एक कारण आहे. आणि ते म्हणजे या दगडा भोंवतीं असलेली एक लोककथा. आपण गांवांत गेलो कीं, प्रथमदर्शनी आपले लक्ष या दगडाकडे वेधले जात नाहीं. तसें रूपहि त्या दगडाचें नाहीं. आणि विशेष चौकशी केल्यावांचून त्या दगडामागील कल्पना बंधहि करणें शक्य नाहीं. तशी कथा स्मरणांतून गळून गेलेली आहे. वृद्धांच्या स्मरणांत जी आहे ती उजळ नाहीं. अस्पष्ट, अंधुक अशी आहे. त्या लोककथेचे विखुरलेले कण तेवढे वृद्धांच्या कडून कळतात आणि त्या कणांतूनच सुसंगत अशी कथा आपल्याला गुंफावी लागते.

लोककथेचा आत्मा तेवढा त्यांतून जाणवतो. त्यांतील स्पंदन हे प्राचीन आहे हेहि कळते. पण बाह्य साज हा उत्तरकालीन असतो. खरे म्हणजे तसे विशेष त्या लोककथेंत तरी काय आहे. आपल्या जीवनांत रोज घडणाऱ्या घटनांची आवृत्तीच त्यांतून झालेली आहे. आपल्या प्रीतीच्या पावित्र्यासाठीं जीवनाचें तर्पण देणारी एक स्त्री दगडाच्या रूपानें येथे उभी आहे. घटना नित्याची, पण आकर्षक आहे. मानवी जीवनाचें मूल्य त्यांतून साकारित झालें आहे. नित्याच्या घटनांतील नाविन्य ओसरते, तसे या लोककथेंतील घटनांच्या बाबतींत मात्र झालें नाहीं. या घटना वेशीजवळ उभ्या असलेल्या त्या दगडांतून सांठलेल्या आहेत. घटना घडल्या कीं, कालांतरानें त्या स्मरणांतून कोसळून पडतात. पण कांहीं घटना साध्या असल्या तरी त्यांचें चिरयौवन संपत नाहीं. काळाचा परिणाम त्यांच्यावर होत नाहीं. पाऊस आला कीं, जमिनींत न दिसणारे बी रूजून वर येते. तशा या घटना मानवी स्मरणाचा स्पर्श झाला कीं, टवटवीत होतात. त्यांची टवटवी असते तोंवर त्यांना नव्या पिढीच्या स्वाधीन केले जाते. नवी पिढी त्यांना स्मरणांत जोजवते आणि त्यांची टवटवी कायम राहते. त्या घटनांत पुराण काळाचा ठसा स्वच्छ उमटलेला असतो. काळाप्रमाणें अभिरुचि बदलते, तसा मानवी संवेदनांतहि बदल होतो. अशा घटनांत ज्या मानवी संवेदना सांठलेल्या असतात, त्यांचे स्वरूप व त्यांचा आविष्कारहि प्राचीन असा असतो. ह्या आविष्काराच्या स्वरूपावरूनहि त्या संवेदनांचा काळ निश्चित करतां येतो.

अशीच प्राचीन संवेदना या दगडांत सांठलेली आहे म्हणूनच ती घटना आजहि विसरली जात नाहीं. घटना विसरायच्या नसतातच मुळीं, पण विस्मरणाची सनातन देणगी अजूनहि दात्यानें परत घेतली नाहीं. पण ज्या विसरल्या जातात त्या सत्वहीनच असतात. अशा घटनांना स्वतःचें अस्तित्व





अनुक्रमणिका

नसते. आपल्या असण्यानें जीवनावर त्याचा परिणामहि होत नाहीं आणि नसण्यानें जीवनांतील फारसें कांहीं हरवत नाहीं. खरें म्हणजे जीवनांतील कांहीं तरी हरवले असे जेव्हां वाटूं लागते तेव्हां तें गवसलेलेच असते. हरवण्याचा भास तेव्हांपासून सुरूं झालेला असतो एवढेंच आणि हा भास शेवटीं नितळ होतो नि कांहींहि न हरवल्याची सत्य जाणीव आकारूं लागते. जे खरोखरच हरवलेले असते, तें आपल्या जवळ कधींच नसते. असण्याचा हा भासच असतो.

स्मरणांत उरलेल्या घटना ह्या आपलें अस्तित्व नोंदवीत असतात. त्या घटनांना विसरण्याचा प्रयत्न केला तरी विसरतां येत नाहीं, अशा घटनांनी सारे जीवनच व्यापलेले असते. जीवनाच्या साऱ्या प्रेरणांचे नियंत्रण अशा घटना करीत असतात. मानवी जीवनाच्या इतिहासांत ज्या घटना अशा टिकून राहतात, त्या लोकस्मरणांतून नवे चैतन्य शोधीत असतात. दगडासारख्या साधनांतून ज्या चिन्हांकित झालेल्या असतात, त्यांना जरामरण क्वचितच येते. आणि ज्या चिन्हांकित घटनांना मरण आलेले असते, ती चिन्हें मात्र मानवी बुद्धीला आवाहन करीत असतात. चिन्हांच्या मागच्या घटना गळून पडल्या म्हणजे ते चिन्हहि निर्जीव होते. परंतु ही निर्जीवता ज्वारीच्या दाण्यासारखी असते. पाऊस पडला कीं, दाण्यांतून चैतन्याचा अंकुर बाहेर येतो. चिन्हाच्या मागचे गळून गेलेल्या घटनेचे रहस्य मानवी बुद्धीला उलगडले कीं, तें चिन्हं पुन्हां सजीव रूप घेते व नव्या मानवी जीवनाच्या संदर्भानें पुन्हां नवे आकारसत्य शोधण्याचा प्रयत्न करीत असते. नवा रंग त्या चिन्हाला येऊं लागतो. अशा चिन्हांतून संवेदनांची टिंबें सांठलेली असतात. दुःखाच्या असह्य वेदना असतात, तशा सुखाच्या लाटाहि असतात. अनेक पदरांची गुंफण अशा चिन्हांतून झालेली असते.

परवांची गोष्ट. पैठणला सहज म्हणून गेलो. पैठण ही गतकालाचा इतिहास अंगांगावर कोरून उभी असलेली पुण्यनगरी ! जें ऐश्वर्य या नगरीनें पाहिलें, उपभोगले त्याच्या खुणा अजून येथे आढळतात. पण आजची त्यांची दैनावस्था पाहून मन व्यथित होते. या नगरीच्या रस्त्याच्या कांठा कांठानें रचलेल्या दगडांतूनहि खरे म्हणजे पुण्यात्म्यांच्या पावलांच्या स्पर्शखुणा सांठल्या आहेत. ज्ञानदेवाची कोमल पावलें गोदावरीच्या याच वाळूमय प्रदेशांतून उमटलीं असतील. गोदावरीच्या ओल्या कांठानें या महात्म्याच्या पावलांची चिन्हे उराशी कवटाळली असतील तेव्हां त्या कांठाला किती धन्यता वाटली असेल. आज त्या खुणा बुजल्या आहेत. निदान त्या या जड डोळयांना दिसत नाहींत. अजूनहि या पुण्यनगरीच्या देहावर तो स्पर्श जिवंत असेल. पण त्या चिन्हांमध्यें असलेले तेज सामर्थ्य या कांचेच्या डोळयांत सामावणें शक्य नसेल. खुणा असतीलहि परंतु त्यांना पाहण्याचें डोळयांचें सामर्थ्यच अपुरे असेल. त्या खुणांचा अर्थ कळण्यासाठीं तवढी तपस्याच नसेल.

गोदावरीच्या कांठानें पुढें चालत गेलो. कुठे ज्ञानदेवाच्या अस्तित्वाची जाणीव होते काय म्हणून मन उत्सुक झालें होते. समोर एक कातळ पसरलेला होता, आणि त्यांतूनच गोदावरीच्या पात्रांत उतरण्यासाठीं पायऱ्या कोरलेल्या होत्या. त्या कातळावर गेलो. एक उभट काळा दगड तेथेंच अजून आहे. त्या दगडावर एका रेडयाचे शिल्प कोरले आहे. एका सरळ अखंड रेषेनें रेडयाला आकार दिलेला आहे. दगडावरील सभोवतीचा भाग शिलून काढला आहे. व मध्यभागीं रेडयाचा भरीव भाग उमटला आहे. रेषा तशी जाड आहे. रेषा कोरणारा हात फारसा कलात्मक नसावा हें जाणवते. परंतु या रेषेचें कलात्मक सौंदर्य बघण्याकडे आपली नजर स्थिर होत नाहीं. तोच, आपल्या मनांत एक आख्यायिका तरंगत येते. ज्ञानदेवाच्या सामर्थ्याची जाणीव करून देणारी. खरें म्हणजे ज्ञानदेवाला या आख्यायिकेनें कितीसे मोठेपण येणार आहे ? ज्ञानेश्वरी ही त्यांच्या मोठेपणाची साक्ष आहे. पण आमच्या भोळ्या मनाला मुग्धरांचे मोठेपण आख्यायिकांतूनच जाणवते. तशी ही घटना खरें म्हणजे अद्‌भुतच. रेडयाच्या तोंडातून ज्ञानेश्वरांनी वेद वदविले. सारा गांव या गोदावरीच्या कांठावर एकत्र झाला नि या अद्‌भुत चमत्काराने थक्क झाला. आज ही आख्यायिका लोकस्मरणात जिवंत आहे आणि म्हणूनच या कातळावरच्या या रेडयालाहि सजीवत्व आहे. तशी आजहि या रेडयाची उपेक्षा सुरूं झाली आहे. सभोवतीचे वातावरण तसे प्रसन्न नाहीं. लोकस्मरणांतून ज्ञानदेवाची ही आख्यायिका बुजली कीं, या







रेड्यातील प्राणहि निघून जातील. ज्ञानदेवाच्या मंत्राने या रेषांत अजून चैतन्य आहे, प्राणज्योत आहे. परंतु लोकस्मरण असेल तोवरच हे चैतन्य, एरवी हाहि दगडच.

प्राचीन काळांतल्या घटना अशा कातळांतून आकार घेऊन वसलेल्या आहेत. ह्या शिल्पित पाषाणांतील सर्वच खुणांचा अर्थ लावता आला तर मानवी जीवनाच्या अद्भुतावर प्रकाश पडेल. त्यांच्या मागे उभे असलेले जुने संकेत लक्षांत येऊं लागतील. त्या संकेतांची निर्मिती करणारे मन किती विकसित झालें होते, त्यांच्या विकासाची दिशा कोणती होती याचा अंदाज बांधता येईल. आड बाजूला पडलेल्या या दगडांतून नवा इतिहास लक्षांत येऊं लागेल. आपल्या सांस्कृतिक व पारंपारिक जाणिवा आकलतील. पण या खुणांच्या मागच्या घटना आपल्याला शोधतां आल्या पाहिजेत. त्यांच्या मागें दडलेले मानवी मन समजले पाहिजे. त्या मनाचा थांग लागला पाहिजे.

आतां हेच पाहाना, किती लोकविलक्षण चिन्हं या दरवाजावर उमटले आहे. गेल्या चार शतकांपूर्वी ते या दरवाजाजवळ आलेखित झालें. आणि तेव्हांपासून आम्ही त्याच्याकडे पाहतो आहोंत. पण त्या चिन्हांचे रहस्य आमच्या लक्षांत येत नाहीं. बिबीचा मकबरा ही औरंजेबानें आपल्या पत्नीची समाधी म्हणून बांधलेली ताजमहालची प्रतिकृति ! तशी वास्तु लक्षणीय आहे. समोरच्या आवारातूनच वास्तूची भव्यता नजरेंत भरते. दर्शनी भागांतील उंच दरवाजांत आपण उभे राहिलो कीं, समोर ही पांढरी शुभ्र वास्तु उभी दिसते. वरचा गोलाकार भाग पाहिला कीं, शुभ्र कबूतरच पंख मिटून बसले आहे कीं काय असे वाटते. सारे काम रेखीव प्रमाणबद्ध आहे. संगमरवरी दगडांनीं उभ्या केलेल्या ह्या कलापूर्ण वास्तूच्या प्रत्येक घटकांत एक सुसंगति आहे. वास्तूकडे पाहतांना ही सुसंगतीच आपले लक्ष वेधून घेते.

आपण आंत शिरतो. आणि पुन्हां दोन दरवाजे आपलें लक्ष वेधून घेतात. दरवाजाच्या आंत राणीची समाधी आहे. दोन्ही दरवाजावर वेलींची नक्षी कोरलेली आहे. वेलींची लांब, निमुळती हिरवी पालवी आपल्या मनांत भरते. मधूनच पक्व झालेली फळें खालीं लोंबकळतांना कोरलेली आहेत. दोन्ही दरवाजावरील ही वेलींची नक्षी अगदीं सारखी आहे. एखाद्या वेलीची फांदी देखील वेगळी वांकलेली नाहीं. मग दोन्ही दरवाजांत फरक काय आहे ? हा फरक केवळ एका चिन्हांत आहे. ते चिन्हं आहे पोपटाचें ! हिरव्या वेलीच्या एका डहाळीवर हा पोपट वसला आहे. हा पोपट समोरून जातांना डाव्या हाताच्या दरवाजावर कोरला आहे. हा पोपट केवळ या दरवाजाचे वेगळेपण दाखविण्यासाठीं कोरलेला आहे हे येथील पुजाऱ्याचें स्पष्टीकरण पटत नाहीं. खरं म्हणजे हे दोन्हीं दरवाजे वेगळे आहेत एवढेंच जर त्या कलावंताला अभिप्रेत असते, तर त्यानें वेलींची अगदीं सारखीच नक्षी कशाला काढली असती. हवेच्या झोतानें वेलीच्या फांदीला किंचितहि वेगळा वांक येऊं नये काय ? पण एकसारखीच नक्षी कोरून कलावंतानें यांत यांत्रिकता आणली. त्यानें आपल्या कलेचा अशी सारखी नक्षी कोरून बळीच दिला. एवढा त्याग करणाऱ्या कलावंताला पुन्हां हे वेगळेपण दाखविण्याची उर्मी कां यावी ?

मला वाटते या चिन्हांत कलावंताला आणखी कांहीं तरी अभिप्रेत आहे. नाहीं तर आपल्या कलेचा त्याग करायची हिंमत ह्या कलावंताला झालीच नसती. या दरवाजावर कोरलेला हा पोपट (कीं मैना) पंख मिटून वसला आहे. समोर असलेल्या पक्व फळांत खरं म्हणजे त्याची चोंच गुंतलेली हवी होती. समोर पक्व फळें असतांहि त्याचा उपभोग घेण्याची इच्छा या पोपटाच्या मनांत येत नाहीं. त्याची चोंचहि मिटलेली आहे नि कांहींशी खाली झुकलेली आहे. दोन्ही पायांह जवळ जवळ आहेत. म्हणजे त्याच्या पावलांतहि गति नाही. चोंच मिटलेली असल्यानें तिच्या क्रियेंतून जाणवणारे चैतन्यहि येथे आढळत नाहीं आणि दोन्ही पंख मिटलेले असल्यानें तर त्याच्या पार्थिव देहांतील प्राणच निघून गेले कीं काय असें वाटतें आहे. हा पंख मिटून डहाळीवर वसलेला पोपट येथे समाधी घेत असलेल्या बेगमेचें प्रतीक तर नसेल ? बेगमेचें प्राण निघून गेल्यावर पुरलेला हाडांचा सांगाडाच येथें पोपटाच्या निर्जीव रूपांतून जाणवतो. कुणी सांगावें या पंखमिटल्या पोपटाच्या भोवती सभोवतालच्या प्रदेशांत, एखादी लोककथाहि प्रचलित असेल. परंतु ती आज लोकांच्या स्मरणांत असल्याचें दिसत नाही. या चिन्हाच्या भोवती चिटकून असलेल्या जुन्या घटना आज स्मरणांतून गळून गेल्या आहेत. त्यांच्या मागे आणखी कांहीं रहस्यहि असेल. पण ते अनाकलनीय आहे. एवढे मात्र खरे की, दोन दरवाजाचें वेगळेपण दाखविण्याचे साधन झालेला हा पोपट, तेवढ्या साठीच इतकी शतके येथें थांबला नसता. अशा साधनरूपाची निर्जीवता त्याच्यांत असती तर, तो लक्षणीयहि ठरला नसता. पंखमिटल्या पोपटाची विलक्षण अशी लोककथा लोकस्मरणांत कांहीं शतकांपूर्वी तरी असावी असे वाटते नि आज ती माहित नसल्यानें मन विषण्ण होते. हा बोलका प्राणीहि मग असा निर्जीव होऊन चिन्हाच्या रूपानें अस्तित्वांत उरतो.

दगडांतून, लाकडांतून शिल्पित झालेल्या ह्या खुणा पाहिल्या कीं, मन उदास होतें. या खुणांतून ज्या संकेतांची निर्मिती केली, ते संकेत अधिक रहस्यपूर्ण वाटूं लागतात. ज्या घटनांना या रेषांतून आकार मिळाला त्या घटना अनाकलनीय ठराव्यात याचे वैषम्य वाटते. दगडा, लाकडांतून कोरलेल्या ह्या संकेतबद्ध खुणा म्हणजे मानवी जीवनाची रहस्यपूर्ण लेणी आहेत. मानवी संवेदनांचा इतिहास यांतून दडला आहे. जें मानवी जीवन या खुणांतून, चिन्हांतून आकारले आहे तेंच आजहि अखंडित आहे. जी संस्कृति व परंपरा या चिन्हांतून बद्ध झाली आहे, तिचाच मीहि पाईक आहे. या परंपरेची ओळख करून घ्यावी, आपल्या संस्कृतीचे रहस्य उकलावे असें सारखें मनाला वाटते आहे. आणि म्हणून या खुणांना कधीं पंख फुटतील व त्या माझ्याशीं बोलतील अशी उत्सुकता मला लागून आहे. ह्या खुणा म्हणजे कोल्ह्याच्या बागेतील पिकलेल्या बोरी आहेत. कोल्ह्यासारख्याच त्या लबाड आहेत, धूर्त आहेत. कांहीं तरी सांगितल्याची हुलकावणी त्या देतात, पण कांहींच सांगत नाहीत.

या खुणांतून सनातन संकेतांचे सिंहाच्या पंजासारखे, सामर्थ्यशाली पंजे उमटले आहेत. कोल्ह्याच्या बागेंत उमटलेल्या सिंहाच्या पंजाचा अर्थ लागला तर मानवी जीवनाचा नवा संदर्भ लक्षांत येणार आहे. या खुणांकडे पाहण्याची नवी जाणीव होणार आहे.

● ● ●







अनुक्रमणिका









अनुक्रमणिका



**रोजच्याप्रमाणें** टीचभर मोरीमधें चार तांबे अंगावर घेऊन, जीव मुठींत धरून, देह सांवरत ती बाहेर आली. इतकं जपलं तरी वरच टांगलेल्या कपबशांच्या स्टँडला धक्का लागलाच अन् एक कप खळ्दिशी खालीं पडून त्याचे तुकडे झाले. तिला भीतीनें धडकी भरली. वहिनी मोठेमोठे डोळे करीत फणकारल्याच, 'वन्सं लक्ष ठेवावं जरा! जरा सांवरून घ्यावं! कपबशा खूप महाग झाल्या आहेत!' तिनें आवंढा गिळला. अंघोळ झाली होती तरी घामाच्या धारा लागल्या होत्या! कपाळावरून, मानेवरून! जेवणाआधींच पोट जड झालं होतं. कसाबसा फक्त पहिला भात खाऊनच ती उठली. आरशा-समोर देहाभोंवती साडी गुंडाळतांना नेहमींप्रमाणें आपलं ते प्रमाणाबाहेर वाढलेलं शरीर बघून ती खंतावली. सगळं शरीर जसं ओथंबलं होतं. गाल, छाती! पोटाच्या वळकट्या! तिची तिलाच घृणा आली. बघूं नये असं वाटलं. तोंडाला पावडरचा हात फांसून कुंकू लावून ती आरशासमोरून बाजूला झाली. आणि घाई घाईनें पर्स उचलून ऑफिसला निघाली. वहिनी आंतून ओरडल्या 'वन्सं, येतांना लोणी आणा! वाण्याकडे गहूं सांगायचे आहेत! पैसा म्हणून पुरत नाहीं! आम्ही काय जीव द्यायचा! अन् ह्यांचाच संसार चाललाय अजून! माझ्या मुलांचं कसं व्हायचं. किशोरचं लग्न ह्यांच्यामुळें मोडलं. एवढं चांगलं स्थळ हातचं गेलं! टीचभर जागा! अन्—' कांहींतरी कुरापत काढून वहिनींचं बोलणं रोजचंच होतं! कांहीं तिला उद्देशून! कांहीं तिच्या आईला! वहिनीचा राग या न त्या कारणानं उसळून यायचा अन् मग त्या शब्दांचे फटकारे मारीत रहायच्या! त्याचं ते खोंचक, टोंचून बोलणं चीड आणणारं, तिडीक आणणारं होतं. कधीकधी तिला तें असह्य होई पण आज दहा बारा वर्षं ती तें पचवीत होती. तिला बोलायला तोंडच नव्हतं. आणि गेले चार पांच दिवस तर वहिनींच्या बोलण्याला विलक्षण धार आली होती. त्यांच्या मुलासाठीं—किशोरसाठीं एक मुलगी सांगून आली होती. मुलगी सुंदर होती, श्रीमंताची होती. मुलीच्या आईनं विचारलं होतं, 'मुलाची आजी आणि आत्या इथंच असतात वाटतं! जागा लहान आहे अगदीं!' अन् पुढें मुलीकडच्या लोकांनी नकार कळवला. वहिनी संतापल्या. किशो-रही चार दिवस गप्प होता. आणि पसंत असलेलं ठिकाण जमलं नाहीं म्हणन वहिनींनी थैमान घातलं. सगळ्या दोषाचं खापर तिच्यावर अन् तिच्या आईवर फोडलं. आईपुढें हात नाचवीत ती म्हणाली होती, 'तुमचे शाप फळले आहेत आम्हांला! झाले आतां मनासारखं! माझ्या मुलाचं लग्न करायचं म्हटलं ह्या जळू आहेत ना आम्हांला चिकटलेल्या! आधीच टीच-भर जागा!' आई रडत होती. सुमित्रानें वहिनींपुढें हात जोडले 'वहिनी आम्हा-लाही समजतं आहे तुम्हांला आमच्या-पासून किती त्रास होतो आहे तो! पण



अनुक्रमणिका




सौ. विजया काळे

**तिच्या बरोबरच्या साऱ्यांचीच लग्नें झाली होती. ती शिकली होती. नोकरी करीत होती. घरीं आई होती, भाऊ होता. अखेर तिनेंच कोंडी फोडायचें ठरविलें.**

आतां मात्र तिच्या आईनें तिच्या लग्नाचा ध्यास घेतला होता. दादानेही पहिल्या पहिल्याने खूप खटपट केली पण कुठे कुठे म्हणून जुळेना. तोही कंटाळून गेला. नाही नाही ती घरं धुंडाळायला त्याला उसंतही मिळत नव्हती अन् उत्साहही राहिला नव्हता. आणि आई तर लग्नाच्या विचारानं वेडी झाली होती. तिचा भाऊ बाहेरून आला की आई त्याच्याशींच वाद घालत रहायची ! दादाचीही मुलगी लग्नाला आली होती. तिच्यासाठी एक स्थळ जमलं होतं. आई आडवी झाली "तिचं नाही आधी करायचं ! ही राहिली आहे ! बाजूला पडेल ती ! तिच्या मनाची कशी कल्पना येत नाही ? तुझी मुलगी काळी असून तिचं एका वर्षात जमवलंस ! अन् हिनेच काय पाप केलंय् ? मला माहित आहे तिचा पैसा हवाय् तुला ! स्वार्थी ! स्वार्थी ! आईचा तोल सुटला. ती मोठमोठ्यानें हुंदके द्यायला लागली. मग वहिनी संतापल्या. आणि दादांनी आईला स्वच्छ शब्दांत सांगितलं 'हिचं लग्न माझ्या शक्तीबाहेरची गोष्ट आहे ! दहा लग्न करून दाखवीन पण हिचं जुळवणं शक्य नाहीं ! एकदां तिने गाढवपणा केला आहे आतां तू किंवा तीच आणा स्थळ ! वाटेल तेवढा हुंडादेखील कबूल कर ! कर्ज काढून लग्न करीन पण मला पुन्हा छळूं नकोस !' आई ढसढसा रडत होती.

काय करणार ! तुम्हांला त्यांतून काय सोडवावं, आमची अडचण इथून कशी काढावी ह्याच विवंचनेंत, खटपटींत आहे मी ! तुला आश्वासन देते, चार दोन महिन्यांत कांहींतरी व्यवस्था करते ! पण आईला दुखवूं नकोस सारखी !'

त्या रात्रीं तिनें रोजच्याप्रमाणें आईजवळ विषय काढला, 'तूं जा गजाकडे ! मी कुणाच्या तरी खोलीवर रहाते ! इथं रहाणं अगदी अशक्य आहे. वहिनीचं बोलणं सहन होत नाहीं मला !' पण दोन तास समजूत घालूनहि आई ऐकायला तयारच नव्हती. तिचं एकच पालुपद, 'तुझं लग्न झाल्याशिवाय इथून हलणार नाहीं मी ! जीव गेला तरी ! तिनं हांकलून दिलं तरी !' सुमित्राचा जीव भरून आला. 'आई अग माझं लग्न होणं शक्य आहे कां ! आतां इतके दिवस बघते आहेस ना !' आई उसळली 'कां नाही होणार ? दगडाधोंड्यांची लग्नं होतात, तिथे तुझं कां नाही होणार ? एकाद दिवस तरी देवाला माझी करुणा येईल !' सुमित्रा गप्प बसली. पण घरांतलं वादळ शांत होत नव्हतं.

आतांही ती निघतांना वहिनी उगीचच फणकारल्या होत्या. तिला टचटचून रडूं आलं. आपण काय अपराध केला आहे म्हणून हे जीणं आपल्या नशिबी आलं आहे. एकच अपराध तिच्या हातून झाला होता. मॅट्रीकमध्यें असतांना किंचित् लठ्ठ होती तरी मोठी छान दिसायची. उफाड्याची भरदार, लुसलुशीत अंगाची, सतरावं, सरलं तर वीस वर्षांची वाटत होती. तिच्या त्या रूपानं नादावून जाऊन ओळखीतल्या एका मुलानं तिला मागणी घातली होती. लग्न करून ताबडतोब त्याला लांब असलेल्या नोकरीच्या गांवीं रुजूं व्हायचं होतं. अन् मॅट्रिकचं वर्ष पुरं करण्यासाठीं तो तिला इथें ठेवणार नव्हता. ते ऐकून ती खूप रडली होती. तिचा मॅट्रिक होण्याचा तर हट्ट होता. अगदी सामान्य, लहानग्या कुणालाही पटणारा, परवडणारा ! पण ह्यावरूनच अटीतटीनं ते लग्न झालं नाहीं. तिच्या पोरबुद्धीला त्याची खंत पण वाटली नाहीं. कधीमधे त्याचं आगळं रूप डोळ्यासमोर यायचं ! उंच निंच बांध्याचा, हंसऱ्या डोळ्यांचा तो उमदा तरुण तिची स्वप्नसृष्टी फुलवीत रहायचा एवढंच ! मागून तिला चुटपुट लागली पण वेळ निघून गेली होती. आणि ह्या हट्टापायी जन्माची शिक्षा मिळाली होती. मॅट्रिक नंतर लग्नासाठीं पैसे जमवायला हवेत म्हणून भावानं तिला नोकरी लावून दिली. आणि एकाद वर्ष नोकरी करायची म्हणता म्हणतां चार पांच वर्षं सहज उलटली. ती वर्ष अडचणींचीच गेली. दोन्ही धाकटे भाऊ शिकून निघाले. मोठ्या भावाची पैशाची ओढ संपेचना. तिच्या पशाची घरांत फार गरज होती. ती न कुरकुरता नोकरी करतच राहिली. पण जीवाला इतका कांच असूनही तिचं शरीर मात्र फुगत चाललं होतं. कुठं म्हणून घरबंध बसेना ! तिची ही स्थिति नजरेंत खुपत नव्हती तोपर्यंत आई सकट सगळीजण डोळ्यावर कातडं ओढून सोयिस्करपणें तिच्या लग्नाकडे दुर्लक्ष करीत होती. पण मग तिचं प्रस्थ वाढत चाललेलं बघून आई घाबरली. वहिनी येतां जातां म्हणत 'वन्स जरा कमी खा ! अंग मोडून काम करा ! म्हणजे ठीक होईल !' वहिनीच्या म्हणण्याप्रमाणें खाणं कमी केलं. ऑफिसमधून आली की क्षणभर न बसतां कामासाठीं ती पदर बांधत होती. पण इतका देहदण्ड घेऊनही म्हणावं असं वजन कमी होत नव्हतं. जिना चढला तर धांप लागत होती. भराभर चाललं तर पाय ठणकायचे, सुजायचे ! रात्री निजतांना ती आपले आपणच पाय चेपीत बसायची ! मनांतल्या मनांत उमाळा यायचा ! कांहीं वेळां झालेल्या चुकीबद्दल खंत वाटायची अन् मग रडण्याचे कढ यायचे ! उशी भिजून चिंब व्हायची !








सुमित्रालाहि हुंदके फुटत होते. दोघी कित्येक वेळ त्याच अवस्थेंत होत्या. सुमित्रा भानावर आली. आईचीच कींव आली तिला ! तिनें आईला सांगितलं 'आई तुझी तडफड समजते मला. पण सगळ्यांचा नाइलाज आहे. पण आतां सांगू मीच माझ्यासाठीं खटपट करते ! तूं दादाला वहिनीला बोलूं नकोस ! पाया पडते तुझ्या ! आपले भोग आपणच भोगायला पाहिजेत !'

आणि दुसरे दिवशी वधूवरसूचक मंडळांत स्वतः जाऊन तिने आपलं नांव घातलं. तिथें नांव नोंदविणाऱ्या खत्रुड चेहऱ्याच्या माणसानीं तिला विचारलं 'कुणासाठी स्थळ !' ती संथपणें म्हणाली 'माझ्यासाठीं' तो म्हणाला 'कठीन आहे' ती काकुळतीला आली 'कसाही चालेल ! माझी कांहीं अट नाहीं. काळा, कुरुप, बिजवर, प्रौढ वयाचा ! फक्त मिळवता मात्र पाहिजे ! 'फीची काळजी करूं नका ! पण निराश करूं नका मला !' त्यानें स्पष्टपणें सांगितलं दुप्पट फी पडेल !' तिने मान्य केलं. अन् दहाची नोट त्याच्यापुढे टाकून ती घरीं आली.

त्यानंतर मोठ्या आशेनें ती मंडळांत रोज खेटे घालायला लागली. महिन्याकांठीं वीसपंचवीस रुपये यांतच खर्च होत होते. पण लग्न कांहीं जमत नव्हतं.

शेवटीं मोठ्या प्रयासानं एका काळ्या कुरुप माणसांनी तिला पसंत केलं. त्याचं भूतासारखं रूप बघून तिला धडकी भरली. त्यांतूनही त्याची गलिच्छ नजर तिच्या सर्वांगावरून फिरत होती. त्याची तिला शिसारी आली, किळस आली ! आईनं तिची समजूत काढली 'अग काळा असला म्हणून काय झालं ! पुरुषांचं रूप नाही बघायचं !' एवढंच नाहीं तर आईनं आग्रह धरला. डोळ्यांतून चारदां पाणी काढलं. आईला काय सांगावं त्याच तिला समजेना. त्याची ती नजर ! त्याचं ते किळसवाणं रूप ! तिच्या बाबतींत लग्न हा व्यवहार आहे हे तिला पटत होतं. पण ही आत्महत्या होती ! नव्हे जिवंतपणीं मरण होतं ! ते करायला ती तयार नव्हती. तिने नकार दिला. तेव्हां घरांत पुन्हां एकदा वादळ घोंघावलं. वहिनी चिडल्या, 'नाहीं ह्या आम्हांला यातनेंतून सोडवणार ! कोण मदनाचा पुतळा आतां मिळणार आहे कुणास ठाऊक ! एकदां मूर्खपणा केला आहे ! पुन्हां तेच चाललं आहे.' तिने स्थळाला होकार द्यावा म्हणून वधूवरसूचक मंडळाचे चालक तिच्या मागे लागले होते. 'आहो आहे ते पदरांत पाडून घ्या ! नाहीतर हल्ली चांगल्या मुलींना देखील कठीण झालंय् ! काळा, कुरुप एवढंच नव्हे तर बिजवर असला तरी त्याला मुलीची उंची, रुंदी आणि सगळीच मापं फिट्ट असावी लागतात !' तो दांत काढून फिद् फिद् हंसला. तिच्या अंगाचा संताप झाला होता. त्याचं थोबाड पुन्हां बघूं नये इतकी त्याची कीळस आली होती. पण ह्या संकटांतून त्याच्या सहाय्याखेरीज मार्ग काढणं अशक्यच होतं ! म्हणून ही विचक्षणा सहन करावी लागत होती. त्याचं उद्दाम बोलणं, पैशाचा हव्यास हंसत हंसत गिळावा लागत होता. ह्या गोष्टीचा वीट आला होता तरी ते दुष्ट चक्र संपतच नव्हतं. तिच्या मनानं आतां भितीच घेतली ! ह्या लग्नाच्या बाजाराकडे फिरकायलाहि मन घेईना !

त्या दिवसापासून वहिनींनी अबोलाच धरला होता. अति झालं की आईच्या गळ्यांत ती पडायची 'आई ! आदल्या जन्मीं काय पाप केल होत मी ! म्हणून माझा तुझा छळ चालला आहे! सगळ्यांच्या दुःखाला मीच कारणीभूत होते आहे. मला वाटतं ह्या शरीराचे लचके लचके तोडून काढावेत ! कां विष खाऊन जीव द्यावा ! आई आई ! वेभानपणें ती रडायला लागायची ! आईच्याही गालावरून अश्रूंच्या सरी ओघळायच्या. ती तिच्या पाठीवरून हात फिरवत रहायची ! आणि मग कांहीं वेळानं ती ठिकाणावर यायची.

असेच दिवस निराशेत चालले होते. रोज रोज कोडगेपणानं ती बोलणी ऐकत होती. त्याच टीचभर मोरींत जीव मुठींत

## माझंच चुकलं !



दुकानाच्यासंबंधीं दोन व्यापाऱ्यांत तंटा होता. पोलीस अधिकाऱ्यांनीं पंचनामा करून दुकानाला टाळें मारले. पण या कृतीची त्या हद्दीच्या मॅजिस्ट्रेटकडे वर्दी देऊन दोन्ही पक्षांना मॅजिस्ट्रेटसाहेबांपुढें बोलावण्याचें कर्तव्य बजावलें नाहीं. पुढें झालेल्या खटल्यांत, दुकानाचा जो खरा मालक होता त्याचें वकील त्या अधिकाऱ्याची उलटतपासणी घेत होते. त्यांत पुढील प्रश्नोत्तरें झाली. "मॅजिस्ट्रेट साहेबांचा हुकूम नसतांना किंवा त्यांना वर्दी दिल्याखेरीज पोलीस दुकानांचा ताबा दोन महिने ठेवूं शकतात काय ?" वकील.

पोलीस अधिकारी :– "मला कल्पना नाहीं. माहीत नाहीं."

"ताबा घेतलात, तेव्हां माहिती होतं कां ?"

"नाहीं."

"या दोन महिन्यांत पोलीसांचा असा अधिकार आहे कीं नाहीं याची माहिती मिळविलीत काय ?"

"नाहीं".

तेव्हां वकिलांनीं विचारले, "म्हणजे या गेल्या दोन महिन्यांत तुम्ही आपली माहिती किंवा अक्कल ह्यांत कांहींच भर टाकली नाहींत ?"

कोर्टाचें वातावरण थोडें गरमागरम झालें. सरकारी वकील तिरीमिरीनें उठून म्हणाले, "माझे विद्वान मित्र असा प्रश्न कसा विचारूं शकतात ? माझा आक्षेप आहे!"

न्यायमूर्तींनी निर्णय देण्याच्या अगोदर व्यापाऱ्याचें वकील म्हणाले, "चूक माफ असावी महाराज ! पोलीस अधिकाऱ्याला अकलेबद्दल प्रश्न विचारला हेंच माझं चुकलं."

—ॲड. यशवंत गोविलकर

धरून अंघोळ करीत होती. पंक्तीला जेवत होती. रात्र रडून जागवत होती. आईनं अंथरूण धरलं होतं. किशोरचं लग्न ! त्याची उद्यां येणारी बायको ! अडचणीची जागा ! कशी फुटणार ही कोंडी ? कधी फुटणार !

त्या दिवशीही अशाच मनाच्या अवस्थेंत ती ऑफीसला गेली. तर दारांतच वधूवर मंडळाचे चालक तिची वाट पहात उभे होते. त्यांनी मोठी शिकार साधली होती. एक सुंदर स्थळ तिच्यासाठी नक्की देखील करून टाकलं होतं. मुलगा दिसायला देखणां, मोठा पगारदार. दोष एवढाच कीं पहिलीं दोन मुलं होती त्याला ! नुकतीच बायको वारली होती ! त्याच मनःस्थितींत तो होता. मुलांची आबाळ होते म्हणून त्याला ताबडतोब लग्न करायचं होतं. मुलांची आई होऊन रहाणारी चांगल्या कुटुंबातली, सच्छील मुलगी हवी होती. बाकी त्याची कांहीं कांहीं अट नव्हती. सुमित्राचा कानांवर विश्वासच बसेना ! अन् चालक पुन्हां पुन्हां बजावीत होते 'आज पांचला या माझ्या ऑफिसमध्यें ! ते स्टेशनवरून परस्पर इकडे येणार आहेत. ओळख करून घ्यायची अन् चार दिवसांत लग्न आटोपूनच त्यांना जायचं आहे !' सुमित्रानं मान हलवली.

तो सारा दिवस कसा हलका हलका वाटत होता. त्याचं नांव गांव विचारलं नाहीं म्हणून चुटपुट लागली होती पण संध्याकाळीं भेट होणारच होती. मग ती हर्षभरानं आईच्या गळयांत जाऊन पडणार होती. वहिनी दादा ह्या सर्व यातनेंतून सुटणार होते. तिच्यापायीं सगळ्या कुटुंबाची झालेली कुचंबणा, भिजत पडलेला प्रश्न एकदम निकालांत निघणार होता. तिला वाटत होतं कुणाला सांगूं हा आनंद! कुणाला सांगूं माझं हें भाग्य !'

पांचाच्या कितीतरी आधींच ती ऑफिस-मधून निघाली. दिवसभर जीव हुरहुरला होता. वधूवर मंडळाच्या ऑफिसचा जिना चढतांना हृदयाची धडधड वाढली. चालकांचे शब्द कानांत घुमत होते..'शंभर टक्के लग्न जुळलंच आहे असं समजा ! फक्त ओळख व्हावी म्हणून एकमेकांना भेटायचं !' ती वर गेली तर समोरच वधूरवर मंडळाचे चालक उभे होते. त्यांनी हळू आवाजांत सांगितलं 'स्टेशनवरून तडक इकडेच आले आहेत. बसले आहेत आंतमध्यें ! तुमचीच वाट पहाताहेत !' तिला एकदम लाजल्या-सारखं झालं. दाराआड बसलेल्या त्या पुरुषाचे फक्त बुटाचे पाय दिसत होते. मॉस रंगाची पँट दिसत होती. तिचा हा आवडता रंग होता. त्याची पाय ठेवण्याची लकब, ऐट तिला इतकी आवडली कीं तिला वाटलं एकदम त्याचे पाय जाऊन धरावेत अन् त्यांना कळवळून सांगावं 'आपल्या मुलांना मी फुलासारखं जपेन. तुमच्यासाठीं माझ्या आयुष्याच्या पायघड्या घालीन. पण मला नाकारूं नका !' ती उंबऱ्याशी अडखळत धडधडत्या हृदयानं आंत गेली अन् त्या पुरुषाला समोर पाहिल्या-वर क्षणभर ती गांगरली. अन् तिच्या डोळ्यापुढं अंधेरी आली. ती भान न राहवून मोठ्याने किंकाळली 'शामराव तूं ! तूं' तो तिचा सख्खा मावसभाऊ होता. किती दिवसातं न भेटलेला. पण एवढासाही बदल न झालेला ! त्यानेही 'सुमित्राताई' म्हणून दबलेल्या आवाजांत म्हटलेलं तिनं ऐकलं आणि अंगावर वीज कोसळावी अशी सुमित्रा समोरच्या खुर्चीत कोसळली.

● ● ●

[ एक प्रयोगक्षम एकांकिका ]

राजाचा पराभव ? राजाचा मृत्यू ? छेः छेः ! बुद्धि-बळाच्या डावांतही ही कल्पना असह्य !! पण विदुषक ओरडून म्हणाला 'राजा मरणार !!'
राजा म्हणाला—'शक्य नाहीं. पहा आतां.'
—आणि आतां आपणही पहा.




# मात

—प्रा. प्रभाकर पाटील



[राजाचें विश्रांतिगृह. रुबाबदार सजावट. दरबारी थाट. प्रकाशांत देदिप्यमान होणारा रात्रीचा प्रहर. ओसंडून जाणारी श्रीमंती. . . . . दारा खिडक्यांना रेशमी पडदे; भिंतीवर मध्य-युगीन चित्रें, रोमन ठेवणींतील शिल्प-मुद्रा, रानटी जनावरांचीं कातडीं, छताला झुंबरें, एकंदर वातावरण प्रेक्षकांचे डोळे दिपवून टाकीत आहे. काळाची, वेगाची, गडबडीची, गोंधळाची जाणीवहि होणार नाहीं इतकें एकंदर चित्र रेखीव, मोहक परंतु प्रेक्षकांना फार फार पूर्वींचें वाटेल असें; मोठ्या आकाराच्या, मध्ययुगीन पेंटींगृज्सारखें.

एक मेज व दोन आसनें, शिसवी नक्षीकामाचीं. राजा व विदुषक बुद्धिबळं खेळत आहेत; प्रेक्षकांना सामोरे. त्यांच्या पाठीमागें दरवाजा. स्तब्ध प्रकाश—एकाग्रता. . . .

उजव्या कोपऱ्यांत एक छोटसं मेज. त्यावर मद्यादि पेयें; विविध रंगाची, आकर्षक. कांहीं चषक.]

(पडदा वर सरतो : क्षणस्तब्धता : नंतर. . . .)

**राजा :** (आत्मविश्वासानें) तुझा अश्व बाद होणार मित्रा बहुतेक.

**विदु. :** महाराजांशीच गांठ आहे. . . बघुयां. . . . हंऽऽ (प्याद्यांची हालचाल.)

**राजा :** टाकला कां पवित्रा ?

**विदु. :** नाहीं ऽऽ अं ऽऽ (प्यादं चालवतो) हं. खेळलो महाराज.

**राजा :** अस्सं ऽऽ वा. . . वा. . .वा. . . असा पवित्रा कां ? छान. . . छान ! घोडा वांचवलास तूं आपला ? (सेवकाला बोलाविण्यासाठीं टाळी वाजवतो.)

**विदु. :** वेळ संपला कां महाराज ?

**राजा :** छे, रे ! अजून पाव घटका खेळता येईल आपल्याला.

**विदु. :** मग कंटाळा कां आला महाराजांना ?

**राजा :** नाहीं, रे मित्रा ! असे डाव खेळण्यांत मजा असते. मौज असते. अगदीं ! टाकलेले डाव उधळून लावण्यांत व

अनुक्रमणिका

नवीन डाव रचण्यांतच बुद्धीचा कस लागतो. वेळ सत्कारणीं लागतो. हीं बुद्धिबळं काय, प्रेम काय, राजकारण काय आणि लढाई काय ! सगळीकडे असेच पवित्रे टाकावे लागतात. असेच व्यूह रचावे लागतात. शत्रूला, प्रतिस्पर्ध्यांना, बंडखोरांना, अपयशाला, मरणाला फसवावं लागतं असे पवित्रे टाकून. अशा पवित्र्यामुळें तर रामायण, महाभारत घडलं. बुद्धिवलवंत बाळकृष्णानं यशोदेला विश्वरूप दर्शन घडवलं. सबंध विश्वाचा एक घांस केला. गीता सांगून डगमगलेल्या पार्थाला जाग आणली व लढाई जिंकली. . . . आणि अभिमन्यूच्या अपयशापासून स्वतःला दूर ठेवायचं असेल तर प्रत्येक राजानें असा पवित्रा टाकला पाहिजे. अपयशानें मरेपर्यंत शत्रूला कळणार नाहीं असा "पवित्रा" टाकला पाहिजे. चांगला राजा व्हायला चांगली बुद्धिबळं खेळतां आली पाहिजेत.

**विदु. :** बोलण्याच्या नादांत प्यादं चालवायचं राहीलं वाटतं महाराजांचं !

**राजा :** अरे हो ऽऽ. . . . विचाराच्या चक्रांत असं होतं बघ मित्रा ! . . . . नाहीं ! पण असा उशीर करून उपयोगाचा नाहीं. वेळ टळली कीं पवित्रा फसतो. प्यादीं मरतात. एखादे वेळीं डावसुद्धां उलटतो. मग एखाद्या साध्या प्याद्याकडून राजासुद्धां ठार होतो. . . (. . . खेळतो.)

**विदु. :** वा ! महाराजांच्या एकाच "पवित्र्यानें" राजा वांचला !

**राजा :** हं, हें असं पाहिजे मित्रा ! असा पाहिजे राजा. . . राज्याचा पवित्रा ! . . . आम्हीं नेहमीं असे सुखांत पहुडलेले असतो, स्वप्नं पहात. मन भरकटत असतं, ढगासारखं. मग एकदम चमकते. एक घाव दोन तुकडे. डाव उलटतो. गनीम मरतो, तडफडून तडफडून मरतो.... असं करतो राज्य आम्हीं, असे टाकतो पवित्रे, असं असावं लागतं राजाचं कसब !

**विदु. :** (मनःपूर्वक कौतुकाच्या भावडेपणानें–) कसं सुचतं हें महाराजांना ? अंतर्ज्ञान झाल्यासारखा फक्त महाराजानींच टाकावा असा हा पवित्रा.

**राजा :** (हंसून) असेलहि मित्रा हा "अंतर्ज्ञानी पवित्रा." पण अशा पवित्र्यामागें अवगत असावं लागतं तें खेळाचं तंत्र. (सेवक येतो.)

**सेवक :** (दरबारी मुजरा करीत) आज्ञा महाराज ?

**राजा. :** मध्यरात्रीं आमच्या शयन गृहाभोवतीं घिरट्या घालणारा तो तरुण सुखरूप आहे ना ?

**सेवक :** होय महाराज. तो आपल्याला भेटण्याची सारखी परवानगी मागत आहे प्रधानांजवळ.

**राजा :** तात्काळ हजर करा मग त्याला इथं.

**सेवक :** (भयंकर घाबरून पण विनयानें. . . . ) पण महाराज..

**राजा :** (मध्येंच एकदम) आम्हीं वाट पहात आहोंत त्याची.

**सेवक :** (मागें होत, मुजरा करीत) जशी महाराजांची आज्ञा. (निघून जातो.)

**राजा :** (विदुषकाला अगदीं सहजपणें) तुमची चाल आहे मित्रा ! दोन क्षणांत खेळ संपविला पाहिजे आतां; आणि मग एका क्षणांत एक विचार !

**विदु. :** (खेळतो) हं (राजाच्या उद्‌गारानें किंचित्–आश्चर्यचकित)

**राजा :** (पटाकडे पहात, कौतुकानें) अस्सं ! वा ! छान पवित्रा. . . . . (खेळतो.) खेळा आतां.

**विदु. :** (खेळतो) हं, हा सरकला आमचा वजीर, महाराज.

**राजा :** (खेळतो) आणि हा आमचा उंट, आमचा पवित्रा.

**विदु. :** (खुषींत येत.) अरे वा ऽऽ ! पांच पवित्र्यांत–'राजाला शह देतां येईल आतां महाराजांच्या कृपेनें !'

**राजा :** (किंचित् तिक्ष्णतेनें) संपला खेळ मित्रा. वेळ टळली. आतां एक प्रश्न. त्या तरुणाबाबत मिळालेली सर्व माहिती बिनचूक असावीच नाहीं ?

**विदु. :** होय महाराज. प्रधानांनी आणि गुप्त हेर-प्रमुखांनी प्रयत्नांची पराकाष्ठा करून त्याची सर्व माहिती गोळा केल्याचें महाराजांना विदित आहेच. त्याचा सर्व पूर्वेतिहास आपल्या हातीं आहे. महाराज, खरं म्हणजे सुळींच द्यावयास हवे होतं, महाराजांनीं असल्या नराधमाला. (किंचित् चिडून) परंतु आपल्या दयाळु स्वभावामुळेंच अजून त्या पातक्याला महाराजांच्या पंक्तीचा मान मिळत आहे. (वरमून) अधिक उण्या शब्दांची माफी असावी सेवकाला महाराज.

**राजा :** आणि आतां मी त्याला प्रत्यक्ष भेटीला बोलावलंय् ! मध्यरात्रीं आमच्या शयनगृहाभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या त्या अज्ञात तरुणाला. . . . केवढा मूर्खपणा करतोय्, नाहीं आम्हीं ?

**सेवक :** (अत्यंत विनयानें) महाराजांच्या आचारविचारांविषयीं आम्हीं पामरांनीं काय अंदाज बांधावेत महाराज ?

**राजा :** आमच्या आचारविचारांविषयीं तुम्हीं अंदाज बांधूं शकत नाहीं?....पण विचार करतां तुम्हीं! "पांच चालींत" राजाला शह देण्याची भाषा करतांना मित्रा, तुझ्या नजरेंत कांहींतरी दिसलं बरं आम्हांला ! . . . या तरुणाच्या बाबतींत आमचा विचार साफ चुकतोय असंच वाटतंय् तुला मित्रा. . .'. . . . तुला वाटतंय आम्हीं घाबरलोंय...

**विदु. :** पण, महाराज—

**राजा :** (जणुं आपल्याच तंद्रींत–) आम्हांलाहि कधीं कधीं असंच वाटतं. एकदां कधींतरी आमची चाल चुकेल आणि एकदाच आमचा 'राजा' कायमचा बाद होईल म्हणून तर आम्ही तासन् तास असे या विश्राम-महालांत तुझ्याबरोबर बुद्धिबळं खेळत असतो. (किंचित् थांबून, वेगळ्या आवा-





अनुक्रमणिका

जांत.)...या तरुणाशीं वेगळा डाव खेळण्याचा म्हणूनच मोह झाला आहे मित्रा आम्हांला !

**विदु. :** म्हणजे या तरुणाची भेट घेण्यांत, मला वाटतं महाराजांचा तसाच कांहीं हेतु असावा ?

**राजा :** तुला आकलन होण्यासारखं नाहीं ते मित्रवर्या !

**विदु. :** (अधीरतेनें) पण अशा वेळीं महाराज आपल्या चरणीं एक विनंति–खचितच् असं करणं अधिक सुरक्षित–

**राजा :** (एकदम हंसत विदुषकाच्या खांद्यावर हात ठेवीत) . . . राजाला "शह" देण्यास पांच चालींचा अवधी आहे अजून मित्रा..... तुला वाटतं कीं रात्रीं–बेरात्रीं आमच्या शयनगृहाभोंवतीं घिरटया घालणाऱ्या त्या भयंकर तरुणाला आम्हीं भेटूं नये ? (अधिक हंसतो.... हळूं हळूं शांत होतो. . . . मग गंभीर आवाजांत.....) संपला वेळ. आज्ञा आहे आमची तुला.

**विदु. :** जशी आज्ञा. (मुजरा करतो. बुद्धिबळाच्या पटाकडे जात) पट उचलूं कां महाराज ?

**राजा. :** नको तसाच राहूं दे. डाव नंतर संपवायचाच आहे तो आपल्याला. (विदुषक दाराकडे घुटमळतो) कांही बोलायचं कां मित्रा अजून ? तुला वाटतं डाव तसाच राहील ? नाही. मात केलीच जाईल कुणावर तरी कुणाकडून. (हंसतो)

**विदु. :** क्षमा करावी महाराजांनी सेवकाला. (जाण्याच्या तयारीत) (क्षणभर शांतता. राजा स्वत: एकवार बुद्धिबळाचा तो अपूर्ण डाव पहात आहे... त्या पकडलेल्या तरुणासह सेवक येतो.)

**सेवक :** महाराजांच्या आज्ञेप्रमाणें बंदीवानाला हजर करण्यांत येत आहे. (मुजरा करतो.)

**राजा :** (बंदीवान तरुणाला निरखित... सुहास्य वदनानें) तेव्हां तोच तूं; रात्रीं बेरात्रीं आमच्या शयन महालाभोंवतीं पहारा करणारा अं ! (हंसतो.)

**तरुण :** होय, मीच तो.

**राजा :** (मनांतील कटु तिरस्कार लपवीत.....) कसे काय गेले दोन दिवस तुमचे आमच्या राजवाड्यांत ? नीट व्यवस्था ठेवली होती ना तुमची; कां कांहीं त्रास झाला ?

**तरुण :** अपेक्षेइतका त्रास झाला नाहीं !

(विदुषक व सेवक रागावतात. किंचित् हालचाल चुळबुळ..

**राजा :** (विदुषक व सेवकाकडे पाहात–) अरे ! तुम्हीं अजून इथेच उभे कां ? या तरुणाशीं थोडी बातचीत करायची आहे आम्हांला. (त्याच्याकडे पाहात) तसा लाजरा आहे तो ! तुमच्या समोर मन उघडं करतां येणार नाहीं त्याला. म्हणून तर असा मध्यरात्रीं एकांतात आम्हांला गांठण्यासाठीं आमच्या शयन महालाभोंवतीं घिरटया घालत होतीं स्वारी. (स्मित हास्य.)

**विदु. :** जशी महाराजांची आज्ञा. पण बाहेर सदरेंत उभं रहाण्यास तरी महाराजांची....

**राजा :** (चिडून पण शांतपणें...) आमच्या आज्ञेस विलंब कां ? विकल्प कां ? (दोघेहि जाण्यासाठीं वळतात. जातां जातां एकदां त्या तरुणाकडे पहातात.)

**राजा :** (विदुषकास) मित्रा, बागेंत जाऊन चंद्रप्रकाशाच्या वहारांत तुझ्या पुढल्या चालींचा विचार कर जा.

[ विदुषक व सेवक निघून जातात. राजा स्वत: दरवाजा लावतो. क्षणशांतता. तो तरुण स्वत:ला सांवरतो.]

**राजा :** (तरुणाकडे येत) बस त्या आसनावर. गादीवर बसल्यापासून आज प्रथम असा योग आलाय् (. . . .राजाच्या चेहऱ्यावर एक प्रकारच्या विश्वासाचं हंसूं पसरत आहे.) खूप वर्षांनीं भेटतो आहेस तूं. (तो तरुण घावरतो; कोमेजतो; थरथरतो.) छे ! छे ! उगाच असा घाबरुं नकोस. कुणाचीहि नजर नाहीं आपल्यावर. आपण दोघंच आहोंत. तूं आणि मी. वाटल्यास दरवाजा उघडून पहा. सदरेंत कुणाची सांवली देखील हलतांना दिसणार नाहीं तुला. (तो तरुण घाईघाईत दरवाजा उघडतो. बाहेर डोकावतो. पुन्हां दरवाजा लावतो. दरवाजा नीट लावण्याची दक्षता घेतो. परत येतो. उभाच) हं बोल. कुणाचा त्रास नाहीं आतां आपल्याला. सांग बघूं काय हवंय तुला ? (तो बसतो.) कां रे दांतखिळी बसली कीं काय ? कां सुरुवात कशी करावी तें कळत नाहीं ?

**तरुण :** फक्त आश्चर्य वाटतंय मला.

**राजा :** आश्चर्य वाटतंय ?

**तरुण :** आश्चर्य वाटतंय् कीं तूं स्वत:हून अशी संधि कां देतोस मला ?

**राजा :** ही अशी संधि ?

**तरुण :** (त्याच्या नजरेला नजर देत....) तुला ठार करण्याची.

**राजा :** अस्सं ! अस्सं ! म्हणजे आम्हांला ठार करण्याची संधि ? ....असं होय....मला देखील वाटलं होतं असं, पण खात्री नव्हती. वा ! वा ! छान !

**तरुण :** देवानेंहि जणुं तुझा शेवट माझ्याच हातीं सोपविलेला दिसतोय्.

**राजा :** हे बघ देवाला बाजूला कर आधीं यांतून. यावेळीं तरी अशा मुर्खपणाच्या गप्पा नकोत. आपल्या दोघांपैकीं एकातसुद्धां देवाला कांहीं गम्य नाहीं. मी स्वत:हून माझा शेवट तुझ्या हातीं सोपवलाय्. साधी वस्तुस्थिति आहे ही. तुला अगदी सहज चिरडतां आलं असतं मला. पण अजून मी तुझ्या केसालाहि धक्का लावलेला नाहीं. तेव्हां तो अंगरख्यांत लपविलेला सुरा आतां बाहेर काढलास तरी चालेल. (हंसतो.)

**तरुण :** एकंदरींत गंमत वाटतेय् तुला ही सारी ?

**राजा :** नाहीं; नाहीं; गंमत नाहीं ! अशा स्थितींत तूं कसा वागतोस तें पहायचंय् मला ! विकृत उत्सुकता म्हण वाटल्यास या माझ्या वागण्याला. पण खरंच भारी मौज वाटतेय् मला या घटकेला.

**तरुण :** आपल्या दोघांच्या दृष्टीनं ही अत्यंत महत्त्वाची घटका आहे.

**राजा :** अत्यंत महत्त्वाची घटका अं ? असेलहि....मला विचारशील तर या घटकेच्या दृष्टीनं आपल्या दोघांना काडीइतकंहि महत्त्व नसेल कदाचित्.

**तरुण :** (पटकन् सुरा काढून) जराहि हालचाल करण्याचा प्रयत्न करूं नकोस.

**राजा :** घाबरूं नकोस. कुणालाहि बोलावलं जाणार नाहीं. ते येण्याच्या आंतच आपला कार्यभाग उरकणार तूं. इतका मूर्ख नाहीं मी. हा मी उभा आहे तुझ्या समोर. कर, कर, वार.

**तरुण :** हूं......

**राजा :** नाहीं. . . . पण नाहींच मी वचाव करणार माझा.

**तरुण :** आकाश कोसळलं तरी सुटका नाहीं तुझी आतां.

**राजा :** आणि तुझी देखील सुटका नाहीं मित्रा ! तुलाहि बाहेर पडतां येणार नाहीं या राजवाड्यांतून.

**तरुण :** इथून जिवंत परत जाण्याची आशाच नाहीं मला.

**राजा :** तुला आंत येऊं देणं हातीं होतं माझ्या. पण पुन्हां बाहेर जाऊं देणं हातीं नसेल माझ्या....माझ्यासारखा तुझा जिव्हाळ्याचा मित्र हरवून बसलेला असशील तूं.

**तरुण :** (संपूर्ण उपहासानें) होय महाराज !

**राजा :** अरे वा ! महाराज अं ? किती विचित्र ! मला वाटलं तुझ्यासारखा प्रत्येक जण तिरस्कार करतो माझा... हें बघ आतां भूल पाड मला. माझ्याबद्दल दया, सहानुभूति, आपुलकी, माया दाखवून हो ना भावविवश. पाड भूल मला, कर खूप.

**तरुण :** तुझ्या खुषीची चिंता मला नाहीं.

**राजा :** ठीक आहे तर, मग खुषी-बिषी कांही नाहीं !

**तरुण :** माझ्या स्वतःच्या भावनांचा काडी इतका देखील संबंध नाहीं याच्याशीं. केवळ देवाच्या इच्छेच्या पूर्तीसाठीं स्वीकारलंयू मी हें काम.

**राजा :** पुन्हां देव ! काय संबंध देवाचा याच्याशीं ? तुला चांगली बुद्धीबळं येतात का खेळतां ?

**तरुण :** (उदासीनतेनें) असें विचित्र प्रश्न कां विचारतोस् तूं अशा वेळीं मला ?

**राजा :** कारण तुझ्या येण्यामुळें आमचा बुद्धीबळाचा डाव तस्साच अर्ध्यावर पडून राहीलाय्. पांच चालींत 'राजा' बाद करण्याची भीति घातलीय् आमच्या मित्रानें....पांच चालींत 'राजा' बाद ! नाहीं, पण ही गोष्ट इतकी सहज साध्य नाहीं !

**तरुण :** पुरे झाली आतां ही वायफळ बडबड !

**राजा :** म्हणजे आमच्याशीं बुद्धिबळाचा डाव खेळणार नाहींस तर तूं ! बरं तर राहील, जशी तुझी मर्जी. मी मात्र अपुरा डाव संपवणार आहे. संपवलाच पाहिजे मला अपुरा डाव!

**तरुण :** (वेगळ्या आवाजांत) तुला कांही सांगायचं आहे; अंतिम इच्छा म्हणून ?

**राजा :** (सहज) मी तुला केव्हांच सांगितलंयू कीं आपल्या या मुलाखतीचा कंटाळा आला कीं शेवट करणं सर्वस्वी तुझ्याच हातीं आहे. मग आतां उगाच वाट कसली बघतोयस् ? छे बुवा ! अगदींच मिळमिळीत वाटतोयस् तूं ? कंटाळवाणं होतंयू बघ सारं.

**तरुण** या अखेरच्या घटकेला देवाचं स्मरण करावं असं नाहीं वाटत तुला ?

**राजा :** देवाचं स्मरण ? हूं ! त्यापेक्षां आपण गप्पा मारूं ?

**तरुण :** जशी तुझी इच्छा.

**राजा :** ठीक तर. ज्या कामासाठीं तूं इथं आलायस् तें करण्यासाठीं लागणारं धैर्य तुझ्यांत येईपर्यंत आपण गप्पा मारूं.

**तरुण :** तुझ्यासारख्याचा जीव घ्यायला धैर्य लागत नाहीं.

**राजा :** उंदराला मारायला देखील धैर्य लागतं !

**तरुण :** माझीच निवड केली गेलीय् या कामाकरतां मुद्दाम.

**राजा :** अच्छा ! म्हणजे तुझीच निवड झालीय ? इतरांनी सांगितलंयू हें काम तुला ? केवढा मान हा ! केवढा सन्मान ! वा ! वा ! किती विशाल दृष्टिकोन तुझा !

**तरुण :** मला राजकीय मतं नाहींत.

**राजा :** राजकीय मतं नाहींत ? अस्सं ! अस्सं ! आणि वैयक्तिक द्वेष भावना देखील नाहीं. मग या अशा कार्याला तूं प्रवृत्त तरी कां झालास ?





अनुक्रमणिका

जांत.)...या तरुणाशीं वेगळा डाव खेळण्याचा म्हणूनच मोह झाला आहे मित्रा आम्हांला !

**विदु.** : म्हणजे या तरुणाची भेट घेण्यांत, मला वाटतं महाराजांचा तसाच कांहीं हेतु असावा ?

**राजा** : तुला आकलन होण्यासारखं नाहीं ते मित्रवर्या !

**विदु.** : (अधीरतेनें) पण अशा वेळीं महाराज आपल्या चरणीं एक विनंति–खचितच् असं करणं अधिक सुरक्षित–

**राजा** : (एकदम हंसत विदुषकाच्या खांद्यावर हात ठेवीत) . . . राजाला "शह" देण्यास पांच चालींचा अवधी आहे अजून मित्रा..... तुला वाटतं कीं रात्रीं–बेरात्रीं आमच्या शयनगृहाभोंवतीं घिरटया घालणाऱ्या त्या भयंकर तरुणाला आम्हीं भेटूं नये ? (अधिक हंसतो.... हळू हळू शांत होतो. . . . मग गंभीर आवाजांत.....) संपला वेळ. आज्ञा आहे आमची तुला.

**विदु.** : जशी आज्ञा. (मुजरा करतो. बुद्धिवळाच्या पटाकडे जात) पट उचलूं कां महाराज ?

**राजा.** : नको तसाच राहूं दे. डाव नंतर संपवायचाच आहे तो आपल्याला. (विदुषक दाराकडे घुटमळतो) कांही बोलायचं कां मित्रा अजून ? तुला वाटतं डाव तसाच राहील ? नाही. मात केलीच जाईल कुणावर तरी कुणाकडून. (हंसतो)

**विदु.** : क्षमा करावी महाराजांनी सेवकाला. (जाण्याच्या तयारीत) (क्षणभर शांतता. राजा स्वतः एकवार बुद्धिबळाचा तो अपूर्ण डाव पहात आहे... त्या पकडलेल्या तरुणासह सेवक येतो.)

**सेवक** : महाराजांच्या आज्ञेप्रमाणें बंदीवानाला हजर करण्यांत येत आहे. (मुजरा करतो.)

**राजा** : (बंदीवान तरुणाला निरखित... सुहास्य वदनानें) तेव्हां तोच तूं; रात्रीं बेरात्रीं आमच्या शयन महालाभोंवतीं पहारा करणारा अं ! (हंसतो.)

**तरुण** : होय, मीच तो.

**राजा** : (मनांतील कटु तिरस्कार लपवीत.....) कसे काय गेले दोन दिवस तुमचे आमच्या राजवाडयांत ? नीट व्यवस्था ठेवली होती ना तुमची; कां कांहीं त्रास झाला ?

**तरुण** : अपेक्षेइतका त्रास झाला नाहीं !

(विदुषक व सेवक रागावतात. किंचित् हालचाल चुळबुळ..

**राजा** : (विदुषक व सेवकाकडे पाहात–) अरे ! तुम्हीं अजून इथेच उभे कां ? या तरुणाशीं थोडी बातचीत करायची आहे आम्हांला. (त्याच्याकडे पाहात) तसा लाजरा आहे तो ! तुमच्या समोर मन उघडं करतां येणार नाहीं त्याला. म्हणून तर असा मध्यरात्रीं एकांतात आम्हांला गांठण्यासाठीं आमच्या शयन महालाभोंवतीं घिरटया घालत होती स्वारी. (स्मित हास्य.)

**विदु.** : जशी महाराजांची आज्ञा. पण बाहेर सदरेंत उभं रहाण्यास तरी महाराजांची....

**राजा** : (चिडून पण शांतपणें...) आमच्या आज्ञेस विलंब कां ? विकल्प कां ? (दोघेहि जाण्यासाठीं वळतात. जातां जातां एकदां त्या तरुणाकडे पहातात.)

**राजा** : (विदुषकास) मित्रा, बागेंत जाऊन चंद्रप्रकाशाच्या बहारांत तुझ्या पुढल्या चालींचा विचार कर जा.

[विदुषक व सेवक निघून जातात. राजा स्वतः दरवाजा लावतो. क्षणशांतता. तो तरुण स्वतःला सांवरतो.]

**राजा** : (तरुणाकडे येत) बस त्या आसनावर. गादीवर बसल्यापासून आज प्रथम असा योग आलाय् (. . . .राजाच्या चेहऱ्यावर एक प्रकारच्या विश्वासाचं हंसूं पसरत आहे.) खूप वर्षांनीं भेटतो आहेस तूं. (तो तरुण घाबरतो; कांपतो; थरथरतो.) छे ! छे ! उगाच असा घाबरं नकोस. कुणाचीहि नजर नाहीं आपल्यावर. आपण दोघंच आहोंत. तूं आणि मी. वाटल्यास दरवाजा उघडून पहा. सदरेंत कुणाची सांवली देखील हलतांना दिसणार नाहीं तुला. (तो तरुण घाईघाईत दरवाजा उघडतो. बाहेर डोकावतो. पुन्हां दरवाजा लावतो. दरवाजा नीट लावण्याची दक्षता घेतो. परत येतो. उभाच) हं बोल. कुणाचा त्रास नाहीं आतां आपल्याला. सांग बघूं काय हवंय तुला ? (तो बसतो.) कां रे दांतखिळी बसली कीं काय ? कां सुरुवात कशी करावी तें कळत नाहीं ?

**तरुण** : फक्त आश्चर्य वाटतंय मला.

**राजा** : आश्चर्य वाटतंय ?

**तरुण** : आश्चर्य वाटतंय् कीं तूं स्वतःहून अशी संधि कां देतोस मला ?

**राजा** : ही अशी संधि ?

**तरुण** : (त्याच्या नजरेला नजर देत....) तुला ठार करण्याची.

**राजा** : अस्सं ! अस्सं ! म्हणजे आम्हांला ठार करण्याची संधि ? ....असं होय....मला देखील वाटलं होतं असं, पण खात्री नव्हती. वा ! वा ! छान !

**तरुण** : देवानेंहि जणूं तुझा शेवट माझ्याच हातीं सोपविलेला दिसतोय्.

**राजा** : हे बघ देवाला बाजूला कर आधीं यांतून. यावेळीं तरी अशा मुर्खपणाच्या गप्पा नकोत. आपल्या दोघांपैकीं एकातसुद्धां देवाला कांहीं गम्य नाहीं. मी स्वतःहून माझा शेवट तुझ्या हातीं सोपवलाय्. साधी वस्तुस्थिति आहे ही. तुला अगदी सहज चिरडतां आलं असतं मला. पण अजून मी तुझ्या केसालाहि धक्का लावलेला नाहीं. तेव्हां तो अंगरख्यांत लपविलेला सुरा आतां बाहेर काढलास तरी चालेल. (हंसतो.)

**तरुण** : एकंदरींत गंमत वाटतेय् तुला ही सारी ?

**राजा** : नाहीं; नाहीं; गंमत नाहीं ! अशा स्थितींत तूं कसा वागतोस तें पहायचंय् मला ! विकृत उत्सुकता म्हण वाटल्यास या माझ्या वागण्याला. पण खरंच भारी मौज वाटतेय् मला या घटकेला.



अनुक्रमणिका

**तरुण :** आपल्या दोघांच्या दृष्टीनं ही अत्यंत महत्त्वाची घटका आहे.

**राजा :** अत्यंत महत्त्वाची घटका अं ? असेलहि....मला विचारशील तर या घटकेच्या दृष्टीनं आपल्या दोघांना काडीइतकंहि महत्त्व नसेल कदाचित्.

**तरुण :** (पटकन् सुरा काढून) जराहि हालचाल करण्याचा प्रयत्न करूं नकोस.

**राजा :** घाबरूं नकोस. कुणालाहि बोलावलं जाणार नाहीं. ते येण्याच्या आंतच आपला कार्यभाग उरकणार तूं. इतका मूर्ख नाहीं मी. हा मी उभा आहे तुझ्या समोर. कर, कर, वार.

**तरुण :** हं......

**राजा :** नाहीं. . . . पण नाहींच मी वचाव करणार माझा.

**तरुण :** आकाश कोसळलं तरी सुटका नाहीं तुझी आतां.

**राजा :** आणि तुझी देखील सुटका नाहीं मित्रा ! तुलाहि बाहेर पडतां येणार नाहीं या राजवाड्यांतून.

**तरुण :** इथून जिवंत परत जाण्याची आशाच नाहीं मला.

**राजा :** तुला आंत येऊं देणं हातीं होतं माझ्या. पण पुन्हां बाहेर जाऊं देणं हातीं नसेल माझ्या....माझ्यासारखा तुझा जिव्हाळ्याचा मित्र हरवून बसलेला असशील तूं.

**तरुण :** (संपूर्ण उपहासानें) होय महाराज !

**राजा :** अरे वा ! महाराज अं ? किती विचित्र ! मला वाटलं तुझ्यासारखा प्रत्येक जण तिरस्कार करतो माझा... हें बघ आतां भूल पाड मला. माझ्याबद्दल दया, सहानुभूति, आपुलकी, माया दाखवून हो ना भावविवश. पाड भूल मला, कर खूष.

**तरुण :** तुझ्या खुषीची चिंता मला नाहीं.

**राजा :** ठीक आहे तर, मग खुषी-बिषी कांही नाहीं !

**तरुण :** माझ्या स्वतःच्या भावनांचा काडी इतका देखील संबंध नाहीं याच्याशीं. केवळ देवाच्या इच्छेच्या पूर्तीसाठीं स्वीकारलंय् मी हें काम.

**राजा :** पुन्हां देव ! काय संबंध देवाचा याच्याशीं ? तुला चांगली बुद्धीबळं येतात का खेळतां ?

**तरुण :** (उदासीनतेनें) असें विचित्र प्रश्न कां विचारतोस् तूं अशा वेळीं मला ?

**राजा :** कारण तुझ्या येण्यामुळें आमचा बुद्धीबळाचा डाव तस्साच अर्ध्यावर पडून राहीलाय्. पांच चालींत 'राजा' बाद करण्याची भीति घातलीय् आमच्या मित्रानें....पांच चालींत 'राजा' बाद ! नाहीं, पण ही गोष्ट इतकी सहज साध्य नाहीं !

**तरुण :** पुरे झाली आतां ही वायफळ बडबड !

**राजा :** म्हणजे आमच्याशीं बुद्धिबळाचा डाव खेळणार नाहींस तर तूं ! बरं तर राहीलं, जशी तुझी मर्जी. मी मात्र अपुरा डाव संपवणार आहे. संपवलाच पाहिजे मला अपुरा डाव!

**तरुण :** (वेगळ्या आवाजांत) तुला कांही सांगायचं आहे; अंतिम इच्छा म्हणून ?

**राजा :** (सहज) मी तुला केव्हांच सांगितलंय् कीं आपल्या या मुलाखतीचा कंटाळा आला कीं शेवट करणं सर्वस्वी तुझ्याच हातीं आहे. मग आतां उगाच वाट कसली बघतोयस् ? छे बुवा ! अगदींच मिळमिळीत वाटतोयस् तूं ? कंटाळवाणं होतंय् बघ सारं.

**तरुण** या अखेरच्या घटकेला देवाचं स्मरण करावं असं नाहीं वाटत तुला ?

**राजा :** देवाचं स्मरण ? हं ! त्यापेक्षां आपण गप्पा मारूं ?

**तरुण :** जशी तुझी इच्छा.

**राजा :** ठीक तर. ज्या कामासाठीं तूं इथं आलायस् तें करण्यासाठीं लागणारं धैर्य तुझ्यांत येईपर्यंत आपण गप्पा मारूं.

**तरुण :** तुझ्यासारख्याचा जीव घ्यायला धैर्य लागत नाहीं.

**राजा :** उंदराला मारायला देखील धैर्य लागतं !

**तरुण :** माझीच निवड केली गेलीय् या कामाकरतां मुद्दाम.

**राजा :** अच्छा ! म्हणजे तुझीच निवड झालीय ? इतरांनी सांगितलंय् हें काम तुला ? केवढा मान हा ! केवढा सन्मान ! वा ! वा ! किती विशाल दृष्टिकोन तुझा !

**तरुण :** मला राजकीय मतं नाहींत.

**राजा :** राजकीय मतं नाहींत ? अस्सं ! अस्सं ! आणि वैयक्तिक द्वेष भावना देखील नाहीं. मग या अशा कार्याला तूं प्रवृत्त तरी कां झालास ?




अनुक्रमणिका

**तरुण :** तुझ्या प्रजाजनांपैकीं मी एक. माझे वडील नि वाडवडिल शेतकरी होते. तू आमचा राजा.... अशा या अनेक शतकांच्या यातना आणि गुलामगिरी यांचा अनेक शतकांची जुलमी सत्ता व अन्याय यांच्याशीं चाललेला झगडा. मी 'आज'चा विचारच करीत नाहीं. 'काल' आणि 'उद्यां' हेंच माझें लक्ष्य. तुझी जातच क्रूर आणि निर्दय ! तुझी जात विरुद्ध आमची जात हाच झगडा. वस्सं—इतकंच ! बाकी मला माहित नाहीं. यांत तुला आणि मला कांहीं अर्थच नाहीं. अन्यायाविरुद्ध प्रतिकार; वस्स् ! म्हणूनच बंड उभारणाऱ्या प्रजाजनांत सामील आहे मी. त्यांच्या विचारसरणीची बारीकसारीक माहिती नाहीं मला. पण आम्हीं सर्व एक आहोंत. एकाच जोखडाखालीं आमच्या सगळ्यांच्या माना रक्तबंबाळ झालेल्या आहेत. आमचं रक्त एक आहे. आमच्या सर्वांगांवर वेदनेचे वळ आहेत. भीतीची लूत आहे. उद्यांची भीति. . . . आणि म्हणूनच आतां मी हा असा तुझ्यासमोर ऊभा आहे. त्यांच्यासाठीं तुझा वळी घ्यायला.

**राजा :** वा ! वा ! छान, छान ! शोकान्त नाटकांतील धीरोदात्त नाटकाच्या स्वगतांसारखे तुझें भाषण लक्ष्यवेधी आहे.

**तरुण :** प्रजेची आज्ञा आहे ही राजाला.

**राजा :** राजाला प्रजेची आज्ञा.... अनेक शतकांच्या अन्यायाविरुद्ध अनेक शतकांचं दुःख ! छान, छान ! आज तूं या अन्यायाचा शेवट करणार आहेस नाहीं ? केवळ इतर प्रजाजनांच्या वेदनेनें व्याकुळ होऊन स्वतःच्या दुःखाची पर्वा न करतां तूं इथें आलास; केवढं तुझं धैर्य ! वज्राघात सहन करणारी तुझी छाती !. . . . अन्याय विरुद्ध न्याय, राजा विरुद्ध प्रजा, जाति विरुद्ध जात. मी एका जातीचा, तूं दुसऱ्या. आपल्या जातीसाठीं बदला घ्यायचाय् तुला. तुझं रक्त सांगतंय् तसं तुला. रक्ताशी इमान राखण्यासाठीं तूं आलास. केवढी अभिमानाची गोष्ट ही ! केवढा पराक्रम ! केवढं अलौकिक धैर्य तुझं !

**तरुण :** (मध्येंच चिडून) फार वेळ ताटकळत राहिलोय् मी.

**राजा :** थांब थोडा अजून. तुला कांहीं सांगायचंय् मला. तुझं स्वतःचं जीवन देण्याच्या आणि माझा जीव घेण्याच्या अवधींत थोडा विचार करायचाय् तुला. कदाचित् तूं आणि मी एकच आतांपासून; आणि कदाचित् पूर्वीपासून देखील. . . .

**तरुण :** कसली मूर्खासारखी वडवड करतोयस् आतां ?

**राजा :** तूं.....तूंच आहेस ?

**तरुण :** कां ? वेड लागलंय् कीं काय तुला ?

**राजा :** थांब थोडा! असा घाईला येऊं नकोस. (एकाग्र आवाजांत) बालपणीं तुला एक भाऊ होता. एकाच बिछान्यावर झोपायचेत तुम्हीं दोघे. एकमेकांच्या गळ्याभोंवतीं बाहु लपेटून शेतांत हुंदडायचेत् तुम्हीं ! एकमेकांचे हात हातांत घेऊन खेळण्यांवरून ओरबडायचेत् तुम्हीं एकमेकांना. तूं सात वर्षांचा असतांना शेताच्या वाटेवरून एक घोडेस्वार आला आणि तुझ्या भावाला घेऊन गेला. किती रडलास तू एकटांच तेव्हां शेतांत मुक्या आकाशाखालीं. रडत रडत घरीं येऊन तूं तुझ्या आईवडीलांना सांगितलीस त्याची कथा. आईवडीलहि तुझे धाय मोकलून रडले. आईनं अंथरुण धरलं तेव्हांपासून आणि वडील कायमचेच वांकले कमरेत..... आठवतं अजून तुला हें सारं ? (त्याच्याकडे स्थिर नजरेनें पहात.) आठवतो तुला अजून, तुझ्या त्या हरवलेल्या भावाचा चेहरा, आठवतो ?

**तरुण :** (मनःपूर्वक) आठवतो. अजून दिसतंय् मला तें सर्व, लख्ख सूर्यप्रकाशासारखं.

**राजा. :** पुढे आई वारली. वडिल निकामी झाले. घराचं मशान झालं. काकांच्या घरीं जाऊन लहानाचा मोठा झालास तूं. लोकांच्या शेतांत खपूं लागलास, मजुरी करूं लागलास.





अनुक्रमणिका

**तरुण :** (एकदम जाग येऊन) बंद कर तुझं तोंड ! अशानं फसणार नाहीं मी. कांहींच सिद्ध करतां येणार नाहीं तुला; कांहींच बदलतां येणार नाहीं. बदलणारच नाहीं कांहीं. गुप्तचरांकडून सर्व माहिती गोळा केलीयस् तूं माझी. मी कोण होतो, काय आहे, सगळ्यांची.........आणि याचा संबंध काय आतां ?........

**राजा :** (मध्येंच) बरोबर आहे ! कांहींच संबंध नाहीं याचा आतां. कांहींच सिद्ध करतां येणार नाहीं आतां मला. पण नेला होता ना तुझा भाऊ असाच एका स्वारानं ?

**तरुण :** (पुन्हां मनःपूर्वक) हो.

**राजा :** (भारावलेल्या आवाजांत) तो तुझा भाऊ....मीच ! मीच तुझा तो पळविलेला भाऊ.

**तरुण :** अस्सं ! म्हणजे (हंसतो) नाटक ! खोटं, खोटं, सगळं खोटं, कपोलकल्पित ! मला फसविण्यासाठीं तयार केलेला एक सापळा. काय मिळवायचंय् तुला मला अशा थापा मारून ?

**राजा :** कांहीं नाहीं.

**तरुण :** वाटतं कां तुला विश्वास ठेवावा मी तुझ्यावर ? भाऊ म्हणून तुला मिठी मारावी ? विश्वास ठेवून तूं सांगशील त्याप्रमाणं वागावं ?

**राजा :** कसलीच अपेक्षा नाहीं माझी तुझ्याकडून (क्षणभर शांतता) एक मेलेला मनुष्य दुसऱ्या मेलेल्या माणसावरोबर बोलत आहे.

**तरुण :** तुझ्या या कपोलकल्पितावर विश्वासच ठेवूं शकत नाहीं मी. अशी शक्कल लढवणार तूं, याबद्दल खात्री होती माझी. (हंसतो.)

**राजा :** कसलीच शक्कल नाहीं यांत. मला ठार करण्याची संधि तुला कां दिली या तुझ्या प्रश्नाचं उत्तर देत होतो मी.

**तरुण :** खोटं साफ खोटं.

**राजा :** (विचित्र पद्धतीनें) खरंच खोटं, ? सगळंच नाटक ? खरंच कपोलकल्पित ! या राजवाड्यांत विलास करणारा मी, एका शेतकऱ्याचा मुलगा ! कसा बसावा विश्वास कुणाचा? कुठं राजा आणि कुठं मातींतच मरणारा शेतकऱ्याचा मुलगा ? पण....पण..मग माझं हें रक्त, असं कां उचंबळत आहे ? कां ठरवत आहे मला, राजाला, शेतकऱ्याचा मुलगा, शेतकऱ्याचा भाऊ ? माझ्या रक्तासाठीं भुकेलेल्याचा भाऊ ? हे सत्य माझ्या माथीं बसेपर्यंत मी तरी विश्वास ठेवला असतां कां या गोष्टीवर? .....वाटतं तुला असं ? मला देखील कळते खोटयाच्या पसाऱ्यांतून सत्यच कसं उचलायचं तें ! मला जे कांहीं दिवसापूर्वीच कळलं तें अनेक वर्षांपासून अस्तित्वांत आहे. मीच माझ्या शेवटाकडे आलेलो आहे, अन्ताकडे आतां शक्य नाहीं मागं जाणं. मीच अन्त करणार होतो माझा. आत्महत्या करून, पण मृत्यूची भीति वाटली मला. उचंबळणाऱ्या रक्ताला वाट करून द्यायला....

**तरुण :** (कानांवर हात ठेवीत) खोटं; खोटं; साफ खोटं; शक्य नाहीं, हे शक्य नाहीं.....

**राजा :** (तीक्ष्ण आवाजांत) मग संपव तुझं काम आत्तांच. संपव नाहींतर स्वतःच्या भावाला....नाहीं तर जा, आत्तांच जा; दरवाजा उघडून, आत्तांच्या आत्तां पळून जा. जीव घेऊन पळून जा.

**तरुण :** (उपहासानें) वा ! सुंदर ! (हंसतो ) परत जाअं ? पळून जाऊं ?—आणि माझ्या साथीदारांना काय सांगू ? राजानं मला पळवून नेलेल्या भावाची परिकथा सांगितली आणि मी पळून परत आलो. त्याला न मारतां मरणकालाच्या त्याच्या तडफडणाऱ्या यातना न पहातां ? वा ! वा ! छान ! छान ! (सुऱ्याचा नेम धरतो)

**राजा :** (थंडपणें ) कर तर मग ठार मला.

**तरुण :** (सुरा उंचावतो–पुढे जातो. त्याच्या डोळ्यांत पहातो) मी–तूं माझा.....

**राजा :** पहातोस काय ? घाल घाव. खुपस सुरा.

**तरुण :** नाहीं, घालतां येत नाहीं घाव मला. कदाचित् तू सांगितलंस् तें खरंहि असेल. (सुरा लपवतो ) आतां हे सगळं खोटं ठरलं, तरी मी जगूं शकत नाहीं, आणि सर्व खरं असूनहि माझं मरण टळणार नाहीं.

**राजा :** मरणाशिवाय दुसरा मार्गच नाहीं आपणां दोघांना.

**तरुण :** खरं बोललास तूं पण तुला मारण्याचं धैर्य नाहीं आतां माझ्यांत. खरं सांगतो, तुला मारूं शकत नाहीं मी. दुसरा कांहीं मार्ग शोधला पाहिजे. दुसरा एखादा मार्ग ....

**राजा :** विष पिण्याइतकं धैर्य आहे तुझ्यांत ?.....वा ! छान ! (कोपऱ्यांत जाऊन दोन चषक आणतो. उजव्या हातांतील चषक दक्षतेनें तरुणाच्या हातीं देतो व डाव्या हातांतील चषक स्वतःच्या हातीं ठेवून अंगरख्यांतून एक कुपी काढतो




बरं का ? हीं चित्रें कैद्यांनीं तयार केली आहेत.

पाहिलीस ही कुपी ? विष आहे हें जालीम विष. सतत छाती-जवळ वाळगतो ही कुपी, वेळप्रसंगी हें विष उपयोगी पडावं म्हणून. आज सार्थक झालं हें विष सांभाळण्याचं. गळ्याखाली उतरल्यावरावर झोंपेसारखा मृत्यु. तडफड नाहीं, दग दग नाहीं. शांत मरण.. पण मला असं मरायचं नाहीं. माझी आत्महत्या इतकी साधी नकोय मला. तूं हें विष घे. तू लहान आहेस. मी तुझा तो सुरा खुपसून मरेन क्षणार्धांत, मरणाच्या वेघना अनुभवीत

**तरुण :** (हातांतील चषक हातांत घेऊन उठत) खोटं—खोटं साफ खोटं. सगळं कुभाण्ड. फसवतोयस् तूं मला. मी विष पिऊं प्रथम आणि नंतर तूं मरणार काय ? (हंसतो) नाहीं..... अजून सात वर्षांचा पोरगाच राहिलेलो नाहीं मी.

**राजा :** (स्थिर दृष्टीनें व आत्मविश्वासानें) आली ना शंका तुला ? वाटलंच होतं मला (त्याच्या दिशेनें कुपी पुढे करीत) उघड ही कुपी. आणि ओत तें विष माझ्या प्याल्यांत (झटक्यांत तरुण अर्ध विष त्याच्या चषकांत ओततो, राजा तें पितो.....तरुण आश्चर्यचकित्, घाबरलेला, काय केलं आणि काय झालं, काय करावं आतां... असा चेहरा) .........शाब्बास ? धैर्यवान् आहेस तूं. अगदीं सावकाश मरण येतंय् आतां.......आ ऽऽ.....आई ऽऽऽ ग ऽऽऽ ( तरुण उरलेलें विष स्वतःच्या प्याल्यांत ओततो. प्याला तोंडाशीं नेतो. थांबतो, दाराकडे पहातो; राजाकडे पाहातो)

**तरुण :** सुटका नाहीं आतां. पळण्याचा प्रयत्न केलास तर सुळीं जाशील. वधाची आज्ञा दिली गेलीय् तुझ्या.... आई ऽऽऽग ऽऽ— (तरुण प्याला तोंडाला लावतो; घोट घेतांना कंठाची तडफड..... विचित्र पद्धतीनें बेहोषींत चषक चाटतो.)

**तरुण :** (अर्धवट तंद्रीत-) फार वेळ थांबावं लागेल ?

**राजा :** कांहीं क्षण. फार जालीम आहे. विष...पूर्वेच्या प्रदेशांत शिकारीला गेलो असतांना एका धनगराकडून मिळवलं होतं......बधिर झाल्यासारखं वाटतंय् नाहीं ? गुंगी आल्या....सारखं ?

**तरुण :** नाहीं, अधिक जिवंत वाटतंय्.....आगीसारखं....तुझं बोलणं अधिक स्वच्छ आणि स्पष्ट ऐकूं येतंय् मला.

**राजा :** हात वर कर तुझे.

**तरुण :** (हात वर करण्याचा प्रयत्न) फार जड लागतायत्....भीति वाटतेय् कां रे तुला ?

**राजा :** (तीक्ष्ण नजरेनें त्याच्याकडे पाहात) नाहीं भीति वाटत नाहीं मला.......अजिबात नाहीं.

**तरुण :** मलाहि नाहीं वाटत.

**राजा :** छान ! पाय हलतायत् तुझे ?

**तरुण :** ( पाय हलविण्याचा निष्फळ प्रयत्न) नाहीं, जाणवत्च नाहीं मला कांहीं.

**राजा :** मलाहि नाहीं हलवतां येत हातपाय.... उठवतंय् तुझ्यानं जागेवरून ?

**तरुण :** (मंद गतीनें) हालचालच करतां येत नाहीं मला. इच्छाच नाहीं हलवण्याची. फक्त डोक्यांत किरकिरतंय् कांहीं तरी.

**राजाः** ऐकू येतंय् तुला ?

**तरुण. :** हो ऐकूं येतंय् अजून. . . . . .
(तरुण अधिकाधिक निःस्तेज होत जातो. . . . . . . . . ओठांची हालचाल. . . . . चेहऱ्यावर स्निग्धता.... . . . एक प्रकारची निरागसता. . . . . )

**तरुण :** (समाधानानें) क्षमा कर हं मला. . . . पण तूं सांगितलेलं खरंच ना रे सगळं ? तूं माझा भाऊ. . . .

**राजा :** (एकदम् उठतो; मोठ्यानं रानटी हंसतो.) खोटं; खोटं; साफ खोटं. सगळं कुभाण्ड, कपोलकल्पित.

**तरुण :** (उठण्याचा प्रयत्न करतो; धडपडतो; लपविलेला सुरा चांचपतो. उठण्याचा प्रयत्न; धडपड.....फडफड....अधिकाधिक निश्चेष्ट पडत जातो.)

**राजा :** (उठून त्याच्यासमोर जात) अजून कांहीं बोलायचंय् तुला ? विचारायचंय् कांहीं ? बोल ना, बोल. अजून बोलतां येईल तुला.

**तरुण :** हलकट......हरामखोर.......पण तुला देखील मरावं लागेल. तूं देखील प्यालायंस् तें विष; माझ्या डोळ्यांसमोर. .

**राजा :** मी मरणार नाहीं. (हंसतो.)

**तरुण :** मरणार तूं. तूंहि मरणार. माझ्या डोळ्यांनीं पाहिलंय्, प्रत्यक्ष घोट घेतांना. . . .पाहिलंय् मी तुला.

**राजा :** तरीहि मी जिवंत आहे. आणि तूं मरत आहेस. (हंसतो) तें विष नव्हतं. विषारी होता प्याला. तुझ्या ओठांना लागलेला. . . . (पावलांखालीं दाबून त्या चषकाचा चक्काचूर करतो-). . . तूं मरतोयस् आणि मी जिवंत आहे; हंसत आहे. . . . (हंसतो.)

**तरुण :** (शेवटचें त्राण) कां ? कां असा डाव साधलास तूं ?

**राजा :** कारण मी राजा; तूं प्रजा. जुलमी सत्ता विरुद्ध न्याय. अन्याय विरुद्ध क्रांति....हा ऽऽ हा ऽऽ (हंसतो) एक रक्त विरुद्ध दुसरं रक्त.....रक्त विरुद्ध रक्त.....तुम्हीं ठार केलेल्या थोरल्या राजपुत्राचें रक्त.....तुम्हीं केलेला त्याचा भयंकर खून.... तुझ्या या मृत्यूपेक्षां भयंकर मृत्यु.... अमानुष खून. . . . कांहींच अर्थ नव्हता युवराजांच्या मृत्यूला, योजना आंखून तुम्हीं केलेल्या माझ्या भावाच्या हत्येला ? म्हणून असा हा डाव खेळलो तुझ्याशीं. . .हा ऽऽ ऽऽ हा ऽऽ. . . .पांच चालींत "राजा वाद".....राजावर मात..... हा ऽऽ हा ऽऽ (तरुण कोसळतो. गतप्राण).... . . . . .मेला शेवटीं. मारायला आला आणि स्वतः मेला. (तरुणाच्या प्रेताकडे जात) शांति मिळेल तुला आतां,... चिरशांति.....जाग नाहीं.....कांहीं नाहीं....कांहीं ऽऽ नाहीं ऽऽ (हंसतो.)
(दाराकडे जाऊन दरवाजा उघडतो, टाळी वाजवितो.)

**सेवक :** (प्रवेश करून) आज्ञा महाराज ?

**राजा :** बागेंत जाऊन आमच्या मित्राला बोलावून आणा, म्हणावं, अपुरा डाव, पुरा करायचाय् आम्हांला.
(जाऊन सुरवातीच्या आसनावर बसतो. बुद्धिबळांच्या पटाचं एकाग्रतेनें निरीक्षण करतो.)
(सावकाश सरकणारा पडदा)

● ● ●

[केनेथ गुड्मन् यांच्या **"द गेम ऑफ चेस्"** या एकांकिकेवरून.]

अनुक्रमणिका














अनुक्रमणिका




१९४२ सालच्या एका वृत्तपत्रावरून :

जनरल मॅक आर्थर यांनी आज घोषित केलें कीं पॅसिफिक बेटावरील जपान्यांचें आक्रमण थोपविण्यांत आलें आहे आणि आमच्या सैन्यांनीं जपान्यांना पिटाळून लावण्याच्या महान कार्याला प्रारंभ केला आहे.

जनरल मॅक आर्थर पुढें म्हणाले कीं, त्यांना पॅसिफिकवरील कित्येक जागा ठाऊक आहेत, जिथें माणसांच्या छोटया गटांनीं जपान्यांशीं युद्ध चालूं ठेवलं आहे. हे छोटे गट अन्नसांठयावांचून किंवा कोणत्याहि प्रकारच्या लष्करी सहाय्यावांचून आहेत, तथापि लढणें त्यांनीं चालूं ठेवलें आहे. "ही शूर माणसें फुकाफुकी लढत नाहींत." जनरल म्हणाले, "आमच्या विजयाचा दिवस येईल तेव्हां त्यांच्या कार्याचें मोल कृतज्ञतापूर्वक लक्षांत घेतलें जाईल."

## [१]

### समुद्रावर एकटाच


लेखक : चार्ल्स् शॉ

अनु. : प्र. श्री. नेरुरकर


**रात्र** बरीच झाली होती. तो अगदीं थकून भागून गेला होता. आणि हताश होण्याच्या बेतांत आला होता. आपल्या तराफ्याचे दोर ताणून धरण्यासाठीं त्याला शिकस्त करावी लागत होती. त्याचा देह आणि समुद्र यांच्यामध्यें तो तराफाच तेवढा काय तो होता ! अर्थात्च तो अगदीं भिजून चिंब झाला होता. तसा तो केव्हांपासूनचा भिजला होता ! परंतु त्या प्रदेशांतील वारा पाणी ऊबदार होतं. तेथील मीठ मात्र वाईट होतं आणि ते त्याच्या डोळ्यांना खुपत होतं. त्यानें आपले डोळे घट्ट मिटून घेतले, आणि बराच वेळ त्यानें ते उघडलेच नाहींत. वादळ झालं होतं. आकाशांत यावेळीं कुठेंच तारका लुकलुकत नव्हत्या. सभोंवार काळोख पसरला होता. त्याचा तराफा लाटांबरोबर भरकटत चालला होता आणि वारा तेवढा ऐकूं येत होता.

इतकं दमून गेल्याबद्दल त्याला खंत वाटत होती. त्याचे हात पाय अगदीं जड झाले होते आणि ताठरले होते. एकदां तो खालीं बसला तर तो एका अंगानें कोसळाच होता खालीं. आणि पुन्हां उठून उभं राहणं त्याच्या जीवावर आलं होतं. त्याच्या ओल्याचिंब कपड्यांतून वारा घोंघावत होता. त्याला थंडी वाजूं लागली. क्षणांतच त्याला झोप अगदीं अनावर झाली.

अर्ध जागृत अवस्थेंत त्याला अर्धी पुरी स्वप्नें बेजार करीत होती. कधीं तो जागा व्हायचा; कधीं तो पुन्हां झोपीं जायचा. त्याला स्वप्नें पडत होती. मधूनच जाग यायची; पुन्हां झोप; पुन्हां झोंप; झोप उध्वस्त करणारी स्वप्नें ! इतक्यांत त्याचा तराफा पाण्यांत अख्खा उभा झाला. त्याला जाग आली आणि तो मोठ्यानें ओरडला. पुन्हां तो तराफा धाडकन् पाण्यांत पडला आणि गरगरा सभोंवार वाटोळा फिरूं लागला. त्यामुळें त्याला भोंवळ आल्यासारखं वाटलं. आपले ओंठ ओले करण्यासाठीं त्यानें जीभेनें पाणी तोंडांत घेतलं; पण पाण्याच्या खारटपणानें त्याला अधिकच मळमळूं लागलं. तितक्यांतच तो तराफा क्षणभर जागच्या जागीं स्थिरावला. जणुं त्याला पुढें जायचंच नव्हतं ! एका जबरदस्त तडाख्यानं तो पुढें ढकलला गेला. महासागराच्या पृष्ठभागावरून तो हळूवार पुढें सरकला आणि मग उलटा पालटा झाला. त्याबरोबर तो समुद्रांत फेंकला गेला होता.

पाण्यांत लाटांखालीं कशाचा तरी त्याच्या पावलांना स्पर्श झाला. आणि मग तेवढ्यांतच पाण्याच्या व वाळूच्या उसळणाऱ्या व त्याला चिरडणाऱ्या वादळांत तो गुरफटून गेला. त्याचे हातपाय एका बाजूला, त्याचा देह दुसऱ्या दिशेला, अशी त्याची असहाय अवस्था झाली. कोणती तरी प्रचंड व्यक्ति त्याला खेंचून नेत होती. कांहीं वेळानें तो थोडासा सांवरला; अंगावर परतला. आतां त्याचा देह वाळूवर पसरला होता. क्षणभर तो तिथें तसाच पडून राहिला. सागरी संकटांतून आपण जीवानिशी सलामत आहोंत यावर त्याचा विश्वासच बसत नव्हता. काळोखांतून कुठून तरी पाणी घोंघावत आलं आणि त्यानें त्याला ढकलून दिलं. तो उठला. मोठ्या कष्टानें तो पाण्यापासून दूर जाऊं लागला. वर वर येण्यासाठीं धडपडूं लागला. त्या कोरड्या भुसभुशींत वाळूंत त्याची पावलें जड जड पडूं लागली. अशाही परिस्थितींत जाववेल तितकं तो गेला. मग मात्र तो खालीं कोसळला. ओल्याचिंब बाहूनीं त्यानें आपला चेहरा झांकून घेतला, आणि तो निपचित पडून राहिला.





अनुक्रमणिका

## [२]

### "कुणीं तिथे आहे कां ?"

**तो** जागा झाला तेव्हां त्याची दृष्टि वर निळ्या आकाशाकडे गेली. आकाश कसं निरभ्र होतं ! तो उठून बसला. समुद्रपक्ष्यांचा एक थवा वाळूतून एकदम हवेंत उडला, आणि चिवचिवाट करीत वर हवेंत गरगरा फिरला.

तो एका अरुंद व सुमारे पाव मैलभर लांबीच्या समुद्रकिनाऱ्यावर येऊन थडकला होता. त्या समुद्रभागाच्या एका टोकाला पसरट अशी एक खडकांची ओळ होती; दुसऱ्या टोंकाला झाडें दिसत होती. त्या झाडांच्या पलिकडे आणखी पाव मैल दूर, त्याला खडकावर आदळणाऱ्या व फुटणाऱ्या लाटांचं लटांबर दिसत होतं. लाटा विरल्या कीं तो खडकाळ भाग त्याच्या दृष्टिक्षेपांत यायचा.

'बहुधा ते खडक ओलांडूनच मी आलो असेन' तो स्वतःशीच पुटपुटला. वेळेचा त्याला नक्की अंदाज करतां येत नव्हता. पण ती वेळ सकाळची होती असं त्याला ठामपणानं वाटतं होतं. पुन्हां एकदां त्यानें सूर्याकडे पाहिलं. तो समुद्रकिनारा पूर्वाभिमुख असल्याचं त्यानें मनाशीं निश्चित केलं. नंतर तो उठला. उष्मा जाणवल्यामुळें हळूंहळूं त्याची पावलें त्या किनाऱ्यावरून अरण्याच्या दिशेनें वळली.

नुकतंच त्याचं पाऊल झाडाझुडपांत पडलं होतं आणि त्याला आकाशांत इंजिनाचा घरघराट ऐकूं आला. झटकन् उडी मारून तो झाडांच्या छायेखालीं लपला; हालचाल न करतां तसाच उभा राहिला. तिथून आकाशांतील विमानाचें तो निरीक्षण करीत होता. छोटेखानी पण फार वेगवान होतं ते ! तें किनाऱ्याजवळ आलं. समुद्र कांठानें उड्डाण करीत वळलं आणि दूर उडून गेलं. तें दृष्टिआड होईपर्यंत तो निरखून पहात होता. मग तो अरण्यांत अधिकच आंत घुसला आणि खालीं बसून तो तर्क करूं लागला. तें जपानचं विमान होतं हें निःसंशय. आपला तराफा समुद्राच्या तळाशीं गेला, याचं पण त्याला नवल वाटलं.

उठून तो ती छोटीशी टेकडी चढूं लागला. त्याची नजर चौफेर फिरत होती. कुठून प्रथमच एखादा आवाज येतो कीं काय हेंही तो ऐकत होता. पण सभोंवार दिसणाऱ्या पक्षांच्या किलबिलाटाखेरीज दुसरा कोणताच ध्वनि त्याच्या कानावर आदळला नाहीं किंवा कुणाचं दर्शन पण त्याला झालं नाहीं.

एका वाटेवर येऊन तो थडकला. तो निरखून पाहूं लागला व त्यानें कानोसा घेतला. कां कुणाला ठाऊक ! तो वळला व त्याच वाटेवरून पुढें चालूं लागला. आतां त्याला बरचसं हायसं वाटत होतं. पण तरीहि तो सावध होता. त्याचे ओठ कोरडे पडले होते आणि घशाला सोस लागला होता. एक जाडशी वेल त्याने तोडली. ती पिळली व तो रस त्यानें प्राशन केला. त्याची चव त्यामुळें बिघडली पण तितकीच त्याची जीभ ओली झाली होती. वाट चढणीची होती. टेकडी चढून तो वर गेला. एकाएकी त्या अरण्यांच्या मोकळ्या जागेंतील एका बंगल्यानें त्याची दृष्टि वेधून घेतली.

तो त्या वास्तूच्या मागील बाजूला येऊन पोंचला होता. लतांनी वेढलेल्या भाजीच्या मळ्याला ती वाट येऊन भिडली होती. बंगल्याजवळच जमिनीवर बागाईतीची कांहीं उपकरणें पडली होती. बंगल्याच्या पायऱ्यांवर एका चाकाला टेकून एक मोडकी तोडकी गाडी उभी होती. दाराजवळच त्याला एक जोडा आणि एक जुनाट बैठकीची खुर्ची दिसली. हे सारं तो स्तब्ध उभा राहून पहात होता. कुणाचं अस्तित्व जाणवतं कां याची तो चाहूल घेत होता. तिथें तर कुणीच नव्हतं. नव्हता कुणाचा आवाज; नव्हती कुणाची कसलीच चाहूल ! ती वास्तूच सारी हरवल्यासारखी वाटत होती व कुठें तरी खोलवर खिन्नपणाची जाणीव होत होती. त्यानें जोरानें ओरडण्याचा प्रयत्न केला. ...

"आऽऽऽऽहूऽऽ......"

त्या नीरव शांततेंत त्याचे शब्द उमटले खरे; पण त्यांना प्रतिसाद मिळाला नाहीं. क्षण दोन क्षण तो थांबला, पुनः त्यानें पुकारा केला.





अनुक्रमणिका

"आ ऽ ऽ ऽहूऽ ऽ ........? कुणीं आहे कां जवळपास ? ........"

सारं स्तब्ध! त्यानें मागें वळून पाहिलं. तसाच तो धांवत बंगल्याकडे गेला आणि पायऱ्या चढून वर गेला. त्याला कसलीच चाहूल लागत नव्हती. कांहींसं अजागळासारखं त्याला वाटलं. मंद पावलें टाकीत पावसाच्या पाण्याने भरलेल्या एका पत्र्याच्या टांकीकडे तो गेला. ती टांकी मघांपासून तो सारखी न्याहाळीत होता.

तें पाणी प्याल्यावर बंगल्याला बाहेरून वळसा घालून तो प्रवेशद्वाराकडे आला. आपण एकटेच आहों याची त्याला खात्री वाटली. पुढच्या दारांजवळ येऊन तो थांबला. नंतर वळून त्यानें खालवर समोर दिसणाऱ्या देखाव्याकडे पाहिलं. त्याला एक फुलांचा बगीचा व त्याच्या सभोंवार लांकडी बैठं कुंपण दिसलं. त्या पलिकडे त्याला उंचवट्याची जमीन दिसली. तिथें झाडबीड कांहीं नव्हतं. तो भूभाग खाली उपसागरापर्यंत जात होता. उपसागराजवळ छोटे असे कांहीं बंगले त्याला आढळले. जवळच होडया उतरून घेण्यासाठी एक निरुंद अशी तर होती. पाण्यांत एकही बोट नव्हती. किनाऱ्यावरही बोट दिसत नव्हती.

अच्छा ! आतां तावडतोब तरी कांहीं करतां येण्यासारखं नव्हतं. फक्त अन्न शोधायचं आणि विश्रांतीसाठीं टेकायचं ! सिगारेट ओढाविशी त्याला वाटली पण तो विचार मोठ्या निग्रहानें त्यानें बाजूला सारला. जवळ सिगारेट नसण्यापेक्षां सिगारेट ओढण्याचा विचारच त्याला सर्वांत तापदायक वाटला. दार उघडून हळूंच तो बंगल्यांत शिरला आणि खोल्या धुंडाळूं लागला. डच भाषेंत छापलेली कांहीं वर्तमानपत्रें त्याच्या हाताला लागली. पण त्याला त्यांतील कांहींच समजलं नाही. तेवढंच काय तें ! बाकी मौल्यवान अशी हरएक वस्तू तिथून केव्हांच लंपास झाली होती.

तिथें कांहीं लभ्यांश होईल याची त्याला खरोखरच आशा नव्हती. बंगल्याच्या दारांतून त्याने खाली त्या तरीवरील इमारतींकडे पाहिलें. एकदां त्याला तिथवर जावं असं वाटत होतं, तर तसं करण्यांत धोका आहे असंही त्याला वाटतं होतं. त्याचं त्यालाच समजेना; पण जिथे तो आतां उभा होता तिथें त्याला सुरक्षितपणाचं वाटत होतं. या विचारांचं त्याचं हंसू आलं आणि वेगाने त्या बंगल्याकडून तो खाली तरीकडे चालूं लागला. मात्र पूर्वीप्रमाणेंच तो डोळ्यांनी नीट पहात होता व कानांनी ऐकत होता.

अर्ध्या तासानंतर पुन्हां तो ती छोटीशी टेकडी चढून बंगल्याकडे येत होता. एक बिस्कीटांचा अर्धा पत्र्याचा डबा व एक तुटकी सुरी सोडून त्या इमारतींत म्हणण्यासारखं कांहींच त्याला आढळलं नाहीं. त्या वस्तू त्यानें बंगल्याकडे येतांना बरोबर घेतल्या.

बंगल्याजवळच्या झाडींत त्यानें तो बिस्कीटांचा डबा लपवून ठेवला; वेलींच्या ताटव्याखालीं त्याने स्वतःसाठीं छुपा आसरा घेतला व जमिनीवर पडून तो झोंपेची आराधना करूं लागला.

## [ ३ ]

## वाट संपते तिथं....

**दुपारीं** जरा उशीरानेंच तो झोंपून उठला.त्याचा शीण आतां बराच ओसरला होता. त्यानें एक नारळ शोधून काढला व तो डब्यांतील बिस्कीटांबरोबर खाल्ला. आतां त्याला सिगारेट हवीशी वाटली; 'पण आतां पुढें काय ?' या विचारांत गर्क होऊन सिगारेटची इच्छा त्यानें दूर सारली.

इतक्यांत त्या घराकडून जाणारी एक वाट पाहिल्याचं त्याला आठवलं. त्या वाटेनें जायचं त्यानं ठरवून टाकलं.

'ती वाट मला कुठेंतरी घेऊन जाणारच,' तो स्वतःशींच मोठ्यानें बोलला. पण स्वतःच्याच बोलण्याचा ध्वनि कानांवर पडला, तेव्हां तो दचकला. तो स्वतःलाच म्हणाला, 'सैनिक ना तूं ? स्वतःशींच काय बडबडतोस ? थांबव तें....' त्यानें आपला बिस्कीटांचा डबा उचलला व तो त्या वाटेकडे चालूं लागला. शेवटीं जंगलाच्या एका दाट भागांत तो आला, जिथें छोटे जीवजिवाणू वावरत होते व आपल्या क्षीण पण कर्कश स्वरांत ओरडत होते. रात्र इतकी जवळ आलेली, आणि आपण एका अनोळखी वाटेनं चालण्यांत चूक तर केली नाहीं ना, असा विचार मनांत येऊन त्याला भीति वाटूं लागली. इतक्यांत अकस्मात् त्याला एक चढण लागली. तिथून त्याला तें जंगल विरळ दिसूं लागलं, आणि मग रात्र पडली व वाटही संपली. तो विस्मितपणें मूक होऊन तिथेंच थांबला.

समोरच ओबडधोबड लाकडांचा एक पायपूल असलेली लहानशी नदी होती. पुलाजवळच, समुद्रशिपल्याच्या कडा असलेल्या बगीच्यामध्यें एक लाकडाचं व झापांचं मिळून बांधलेलं छोटेखानी प्रार्थनामंदिर होतं. त्या प्रार्थनामंदिराच्या एका टोंकाला साधा लोखंडी क्रूस होता. त्या मंदिराच्या उघडया दरवाज्याकडे जाणाऱ्या दोन पायऱ्या तिथे होत्या. आणि खालच्या पायरीवर एक जोगीण बसली होती.

आपल्या तोंडावर घोंघावणाऱ्या कृमिकिटकांना हातानें दूर लोटीत, पण त्यांच्याकडे न पाहतां, त्या जोगीणीकडे पहातच तो पुरुष तिथे तसाच उभा राहिला. तिने आपल्या धार्मिक हुद्याप्रमाणें परिधान केलेल्या लांब, सैल, काळ्या झग्यावर, तिच्या माथ्यावरील लांबलचक टोपी अधिकच पांढरी शुभ्र दिसत होती. तो तिच्याकडे व तिच्या सभोंवार पहातच राहिला. येईल त्या प्रसंगाला तोंड देण्याची त्याची तयारी होती. शिकारीच्या जीवनाचा त्यानें चांगलाच अभ्यास केला होता; कारण आपल्या तुकडीतील इतरांबरोबर लूझन (Luzon) जंगलांत त्यानें सात आठवडे घालविले होते. त्यानंतर त्याला ज्ञात असे समुद्र ओलांडण्यांत त्याचे दिवस गेले होते. त्या आठवडयांत व दिवसांत धोक्याची परिस्थिति उत्तम रीतीनें जाणायला तो शिकला होता.

हातावर डोकें टेकून निश्चल अशी ती त्या मंदिराच्या पायरीवर बसली होती व तो तिला निरखीत होता. तिच्याबरोबर दुसरं कुणी नाहीं अशी खात्री होतांच तो गपचूप टेकडी उतरून खालीं गेला. कोणतीहि आश्चर्यकारक घटना घडली असती तरी तिला तोंड देण्याची त्यानें मनाची तयारी केली होती. पन्नास पावलें असतील नसतील एवढ्या अंतरावर तो आला. आणि तिला त्याची चाहूल लागली. तिनें वर दृष्टि करून पाहिलं. तो थांबला. काळोखांतूनच क्षणभर ती दोघें एकमेकांकडे पहात राहिली. मग ती उठली आणि कांहींतरी शब्द पुटपुटली; पण त्याला त्याचा कांहींच अर्थबोध झाला नाहीं. तिनें एक पाऊल पुढें टाकलं अन् तिथेंच ती अकस्मात् जमिनीवर धाडकन् कोसळली. क्षणभर तो गांगरला. त्यानें आवतीभोंवती पाहिलं. मग त्वरेनें तो तिच्याजवळ गेला व तिच्याशीं बोलला. तिच्याकडून प्रत्युत्तर न आल्यामुळें तो खालीं वाकला आणि तिच्या तोंडावर घसरलेली






अनुक्रमणिका

तिची डोक्यावरची पांढरी वस्त्रें त्यानें हातानें ओढून दूर सारली. तिला श्वास घेतांना अडथळा होत होता तो बंद झाला. ती निपचित पडली होती; तिचं तोंड किंचित उघडं होतं. तिची श्वसनक्रिया त्याला ऐकूं येत होती परन्तु काळोख दाट असल्यामुळें तिनें डोळे उघडले कीं नाहींत हें समजूं येत नव्हतं.

'श्रीमतीजी, आपल्याला बरं वाटतं ना ?' त्यानें विचारलं. कांहींच उत्तर न आल्यामुळें तो उठून उभा राहिला. काय करावं हेंच त्याला सुचेना. पुन्हां तो वांकला व त्यानें जवळून तिला नीट न्याहाळून घेतलं. दुसऱ्या क्षणी, आपले हात झटकन् बाजूला नेण्याची तयारी ठेवीत, त्यानें तिला वर उचललं. तिच्या त्या हलकेपणाचं त्याला आश्चर्य वाटलं. तिला उचलीत तो पायऱ्या चढला व उघड्या दारानें आंत मंदिरांत गेला. अंतर्गृहांत नेऊन त्यानें तिला अलगद जमिनीवर ठेवली आणि तो उतरून खालीं त्या छोटया नदीवर गेला. नदीकिनाऱ्यावर जाऊन तो तिथेंच थांबला. आपण मूर्खपणा केल्यासारखं त्याला वाटलं; कारण त्या जोगिणीला तो पाणी कसं नेणार होता? त्याच्याजवळ त्याचा बिस्कीटांचा डबा देखील नव्हता. तिला उचलतांना त्यानें तो तिथेंच ठेवला होता. क्षणभर विचार करून तो वांकला व त्यानें आपल्या पायांतील एक बूट काढला. त्यानें तो धुतां येईल तितका धुतला; त्यांत पाणी भरून घेऊन तो मंदिराकडे परतला. आतां तो निष्काळजीपणेंच वावरत होता. त्या अंधारांतही त्याला सुरक्षित वाटत होतं. कुणीं शत्रू जवळपास नाहीं याबद्दल तो निश्चित होता.

परिश्रमपूर्वक तो बूट हातांत धरून जेव्हां त्यानें मंदिरांत पाऊल टाकलं, तेव्हां तिथें जोगीणच नव्हती. गोंधळून काळोखांत त्यानें इकडे तिकडे पाहिलं. मग तो वळला आणि त्याच वेळीं कुणी मंद स्वरांत म्हटलं, "मी इकडे बाहेर आहे."

त्यानें सभोंवार पाहिलं. ती खालच्या पायरीवर उभी होती. जंगलांतील त्या काळोख्या रात्रीं तिला शोधणं मोठं अवघड काम होतं.

'अच्छा...' खाली तिच्याकडे जात तो म्हणाला, 'तुम्हीं मला अगदी पुरतं घाबरवून सोडलंत, श्रीमतीजी..'

ज्या आवाजांत त्याला उत्तर ऐकूं आलं त्यांतील समाधान व विस्मय त्याला जाणवला, "तुम्हीं अमेरिकन आहांत ! केव्हां आलांत तुम्हीं ! फादर जूआन तुमच्याबरोबर ———?"

"श्रीमती' हातांतील बूट रिकामा करीत व त्यांत पाय खुपशीत, तो मध्येंच बोलला, "मी अमेरिकन आहे. पण माझ्या खेरीज इथें कुणी नाहीं."

सगळं शांत होतं व ती यावर विचार करीत होती.

"पण—पण— तुम्हीं इथें कसे आलांत ? तुम्ही एकटेच कसे ?"

"श्रीमतीजी," थोडा मागें सरकत तो म्हणाला, 'मी संयुक्त संस्थानांच्या नाविक दलांतील नौसैनिक आहे. आज सकाळीं या बेटाच्या किनाऱ्यावर येऊन मी थडकलो. मी—असो, मीच फक्त एकटा होतो. मला विश्राम हवा आहे, श्रीमतीजी, पण इथें विश्रमणें सुरक्षितपणाचें आहे काय, हें मला कळलें पाहिजे."

ती विचारमग्न झालेली दिसली. तो थांबला. ती एखादी साधीसुधी बाई असती तर त्यानें सारी सूत्रें केव्हांच आपल्या हातांत घेतली असती. परन्तु ती कोणी सामान्य स्त्री नव्हती. आणि त्याच्या आठवणींत तरी (त्याला आठवलं तिथपर्यंत तरी) यापूर्वी कधीं तो एकाद्या जोगीणीशी सुद्धा बोलला नव्हता. धर्मपवित्र कर्मांत गुरफटलेली स्त्री म्हणजे त्याला एक फार मोठं गूढ वाटत होतं. जरी तो तसं बाहेर दिसूं देत नव्हता, तरी मनांतून त्याला एक प्रकारची भीति वाटत होती.

"इथें सारं बिनघोक आहे" ती म्हणाली. "मला जें कांहीं ठाऊक आहे त्यावरून तरी आजवर इथें सारं बिनघोक आहे. तुम्हीं आलांत तेव्हां कुणा एकाची मी अपेक्षा करीत होतें.. मला त्यासाठीं इथं थांबलंच पाहिजे. लवकरच ते येतील, मला खात्री आहे. होय, तुम्हीं त्या मंदिरांत विश्रांती घेऊं शकतां."

"पण तुमचं काय, श्रीमतीजी ? तुम्हीं.........."

"कृपया माझी काळजी तुम्हीं करूं नका. मी कांहीं फार दूर असणार नाहीं. मला इथं कोणताही धोका वाटत नाहीं."

या शब्दांवाटें तिनें स्वतःला त्याच्या मदतीपासून दूर ठेवलं... त्याच्यापासून कोणतीच मदत नको इतकं दूर ! तिला आपली गरज वाटूं नये याचं कांहींसं कां होईना पण त्याला दुःख वाटलं. परंतु तिला आपली मदत नको हें त्यानं जाणलं.

"अच्छा..." कांहींशा अनिश्चयानें तो बोलला, "मला वाटतं मी इथें कुठेंतरी पडूं शकेन."

"गुड् नाईट्.." ती हळुवारपणें म्हणाली, "परमेश्वराची सोबत तुला लाभो."

"आभारी आहे, श्रीमतीजी," किंचित् अस्वस्थ होऊन त्यानें उत्तर दिलं. त्या दरवाजांतून त्या काळोख्या मंदिरांत तो गेला आणि एका कोपऱ्यांत, एक हात डोक्याखाली घेऊन, त्यानें जमिनीवर देह पसरला. क्षणभर डोळे सताड उघडे ठेवून पडल्या पडल्या तो काळोखांत पहात होता; नाना विचार त्याच्या डोक्यांत घोळत होते. मग स्वतःशीच तो उद्गारला, 'किती विचित्र अन् वेडं जग आहे हें!' आणि लवकरच तो गाढ झोपी गेला.

## [४]
## त्याची कथा आणि तिची

**तो** उठला तेव्हां सकाळ कशी करडी व कोरी दिसत होती. हवा उष्ण होती आणि त्या छोटयाशा मंदिराच्या छप्परावर पाऊस पडत होता. त्या दरवाज्यांतून एखाद्या पडद्यासारखा त्याला पाऊस वाटला. संपूर्ण सकाळ पर्जन्य नादानें व गंधानें भरून गेली होती. उठून तो दरवाज्याकडे गेला व त्यानें बाहेर पाहिलं. त्याला जोगीणीची आठवण झाली होती. पावसाच्या त्या जाडजूड पडद्यांतून थोडंसं अंतर सोडून दूरवर पहातां येणं अशक्य होतं. तिथून तो माघारा इमारतींत परतला आणि मंदिराच्या दुसऱ्या टोकाच्या कोपऱ्यांत त्याला ती जोगीण दिसली—काळ्या झग्यांतील एक आकारहीन आकृति! ती गुडघे टेकून प्रार्थना तरी करीत असावी किंवा झोपी गेली असावी.

हाताच्या मागच्या तळव्यानें त्याने आपलं तोंड पुसलं. बराच वेळ त्याने त्या जोगीणीकडे पाहून घेतलं; मग दारांतच जरा आंत एका खांबाला पाठ टेकून तो जमिनीवर बसला व पावसाची गंमत पाहूं लागला.

क्षणांतच त्याने तिची चाहूल ऐकली आणि ती त्याच्याजवळ आली तसा तो उठून उभा राहिला. आतां प्रकाश अधिक फांकला होता. पांढऱ्या शिरोवस्त्रांत बहुतेक झांकाळून गेलेला तिचा चेहरा तरुण दिसत होता. तिच्या डोळ्यांखालीं चिंतेच्या कृष्णछाया दिसत होत्या, परंतु ते डोळे जवळ जवळ लहान मुलाच्या डोळ्यासारखे भासत होते.

"गुड् मॉर्निंग.." ती प्रसन्नतेनं म्हणाली पण तिनें व्यक्तिगत आपुलकी दाखविली नाहीं. त्याच्यापासून दूर पलिकडे पावसाचं निरीक्षण करण्यासाठीं तिनं दृष्टि लावली होती.

"गुड् मॉर्निंग, श्रीमतीजी" तो उत्तरला. "पहा, माझ्याजवळ कांहीं बिस्कीटें व नारळ आहे. हिला कांहीं सकाळची न्याहारी म्हणतां येणार नाहीं, पण पाऊस थांबेपर्यंत आपल्याजवळ आहे ती शिदोरी एवढीच."

"आभारी आहे" ती म्हणाली.

एका मोडक्या सुरीनें त्यानें नारळांतील खोबऱ्याचे तुकडे कापले आणि तिने पुढे केलेल्या हाताच्या ओंजळींत टाकले. तिनें हळुवारपणे आपल्या एका हातांत सर्व कातळचा जमवल्या आणि दुसऱ्या हातानें बिस्कीट घेतलं. शांतपणें व हळुहळु ती दोघे खात होती, अगदीं आपापल्या विचारांत गढून जाऊन. तिच्याशी बोलावं असं त्याला वाटत होतं परंतु काय बोलावं हेंच त्याला कळत नव्हतं. जोगीण हा विषयच त्याच्या अनुभवाच्या पलिकडचा होता.

मंदिराच्या काळोखी कोनाड्यांतून कसल्या तरी धातूचा एक लहानसा वाडगा तिनें आणला. त्यांत तिने पावसाचं पाणी पकडलं. आणि त्याला पिण्यासाठीं दिलं. हवा इतकी उष्ण होती कीं वाफा उफाळत होत्या आणि त्या दोघांत उठून हालचाल करण्याइतकी पण ताकद उरली नव्हती. पुनः तो भिंतीला टेकून बसला होता. आपलें तोंड पुशीत तो पावसाकडे टक लावून पहात होता.

"तिकडे बाहेर जाऊन जरा भिजलो तर अधिक थंडगार वाटेल." तो उद्गारला. आणखी अधिक चांगलं बोलण्यासारखं त्याच्याजवळ कांहीं नव्हतं.

"नको," ती अगदी ठामपणाने एखाद्या शाळा मास्तरणीसारखी बोलली. "असाच मग लोकांना तो ताप येतो."

कसें कां असेना? तिच्या त्या उत्तरानं त्याला अधिक बोलण्याचा धीर आला.

"मी, हँक अलिसन," तो बोलला, "नाविक खात्यांत मागें म्हणालोच होतो मी. इतक्या लवकर लढाईला तोंड लागेल याचा विचार न करतां आम्हांला फिलिपिन्सला पाठविण्यांत आलं.मग लढाई सुरू झाल्यावर आम्हीं इकडे तिकडे थोडी लढाई केली – आणि अच्छा, मला वाटतं मी इथें येऊन पडलो आहे." त्याला आणखी अधिक कांहीं बोलावसं वाटत असावं, पण कसं बोलावं हेंच समजत नव्हतं.

"मनाला त्रास होत असेल तर बोलूं नकोस." ती प्रेमळपणें बोलली. त्या कणभर सहानुभूतीनं अधिक बोलण्याचं धैर्य त्याला प्राप्त झालं.

"मला नाहीं होत त्रास, श्रीमतीजी. कदाचित् माझं त्यांत भलं व्हायचं असेल. गोष्टी जशा घडतात तशा त्या नीट लक्षांत ठेवायचं मला जमत नाहीं. आम्हांला खूप दडावं लागलं, पळावं लागलं, कारण आम्ही फक्त थोडेच जण उरलो होतो. एका रात्रीं आम्ही खाली किनाऱ्यावर आलो. आमच्यापैकीं फक्त आम्ही सहा जण उरलो होतो. आम्ही काळोखांत भटकत होतो. आणि आम्हांला एक रिकामी आणि नुसतीच बांधून ठेवलेली मोटरबोट (motor boat) दिसली. त्या बोटीवर तराफ्याची एक जोडी होती. थोडं अन्न आणि पाणी, आणि एक मशीनगन् सुद्धां होती." आतां त्याला आपल्या सोबतीणीचा विसर पडला होता. आणि वाढत्या आत्मविश्वासानें तो आपली कथा सांगण्यांत रंगून गेला होता.

"आम्ही बोटीवर गेलो." तो बोलूं लागला, "मी आंतील यंत्रसामुग्री नीट न्याहाळून पाहिली. कॅलिफोर्निआला जाण्यापूर्वी आणि जलवाहतूक खात्यांत सामील होण्यापूर्वी मी यंत्रांचीच कामें करीत होतो. "तूं ही बोट चालूं करशील कां?" कॅप्टन मला म्हणाला, "नक्की, सर..." मी म्हणालो, पावसांतच आम्हीं तिला किनाऱ्यापासून दूर समुद्रांत लोटली आणि पुरेसे आंत दूर गेल्यावर मी यंत्र सुरू होऊं दिलें. खरंच त्या यंत्राला ताकद होती." त्या यंत्र शक्तीचा विचार करीत क्षणभर तो अवाक् राहिला.




"एखादी सिगारेट मिळेल तर जवळ जवळ मी माझं सर्वस्व देईन." त्यानें उसासा टाकला. "असो. दुसऱ्या दिवसाची सकाळ उजाडेपर्यंत आम्हीं मोटरबोट चालूच ठेवली. आम्हांला पावसांतूनच जमीन दिसू शकली. आम्हीं ती बोट एका उपसागरांत नेली. तिथं तर कांहीं नव्हतं, फक्त सभोंवार झाडें होती. तिथें आम्ही बोट लावली ती झाडांनी झांकळून टाकली आणि सारा दिवस तिथेंच राहिलों. कॅप्टननें बोटी-वरील नकाशांचं अध्ययन केलं आणि डचांच्या वसाहतीपासून किंवा कदाचित ऑस्ट्रेलियापासून आम्ही फार दूर नाहीं आहोंत असं आम्ही ठरवून टाकलं. कदाचित् अमेरिकन नौसेनेची व आपली गांठ पडेल असं कॅप्टन म्हणाला. आणि अजून अमेरिकन नौदल अस्तित्वांत तरी असेल कां, असा विस्मय कुणीतरी प्रकट केला. असं पहा, श्रीमतीजी, आमच्याजवळ जाणण्याचा कांहींच उपाय नव्हता." त्याने तिच्याकडे आशेनें पाहिलं. तिच्याकडून बातमी मिळण्याचा संभव होता.

"मला माहित नाहीं" ती खिन्नपणें म्हणाली, "माझ्या जवळही जाणण्याचा कोणताच उपाय नव्हता, मिस्टर ॲलिसन..."

त्यानें आपली नजर दुसरीकडे वळविली आणि तो टक लावून पावसाकडे पाहूं लागला. निस्तब्ध असा. त्याच्या डोक्यांत नवा विसंगत विचारांचा गोंधळ माजला होता. त्याने उसासा टाकला व पावसाला शिव्या दिल्या. मग त्याला आपली सोबतीण आठवली. तो तिच्याकडे वळला. म्हणाला, "श्रीमतीजी, मला वाईट वाटतं. मला वाटतं, इथें एक स्त्री आहे हें मी विसरूनच गेलो."

"आभारी आहे" ती म्हणाली. या दुर्घट जगांत तिचं हास्य त्याला सौम्य व गोड वाटलं. "मग पुढें काय घडलं ?"

"काळोख पडून थोडा वेळ होईपर्यंत आम्ही थांबलो आणि मग आमची मोटर बोट आम्ही बाहेर काढली. आम्ही दक्षिणेकडे वळलो, असा विचार करीत कीं बोर्निओच्या तळाला वळसा घातला तर पुन: समुद्रांत जाऊं. सुमारें दहा वाजतां वादळ सुरू झालं. मी पुढे होऊन सुकाणु धरलं आणि कॅप्टन खाली यंत्रें कशी चालतात तें पहाण्यासाठीं गेला. अचूक त्याच वेळीं आम्हीं कशावर तरी आदळलो, किंवा कांहीं तरी आमच्यावर येऊन आदळलं. काय झालं कांहीं कळलंच नाहीं. पूर्वी मी कधींहि पाहिला नसेल एवढा दैदीप्यमान प्रकाश मला दिसला, परंतु मला कांहीं ऐकूं आलं नाहीं कारण माझं डोकं पाण्याखाली होतं. मी स्वत:शींच म्हटलं, हुँक ॲलिसन, तुझा ग्रंथ आटोपला. पण अगदी तितक्यांत तो तराफा माझ्याजवळ तरंगत आला; मी तो चटकन् पकडला. आणि त्यावर चढलो. त्यानंतर मी नुस्ता त्यावर पडून राहिलो आणि आजारी पडलो. मला झोप लागली, इतका मी दमून गेलो होतो आणि त्याच सुमाराला एका मोठ्या लाटेने मला तराफ्या-बाहेर फेकून दिलं. माझे बूट वाळूंत रुतले आणि हा मी येथे आहे."

त्या वाडग्यांतून त्यानें पावसाच्या पाण्याचा आणखी एक घोट घेतला आणि क्षणभर त्या पावसाकडे त्याने डोळे लावले. मग मागे परतला आणि त्याने जोगिणीकडे पाहिलं. तिचं तोंड तिने आपल्या हातांत टेकलं होतं; ती जमिनीकडे पहात होती. ती संथपणे स्वत:-शीच बोलत असल्याचें त्यानं ऐकलं. आणि ती प्रार्थना करीत आहे असं त्याला वाटलं. तो उठूं लागला, पण त्याच क्षणीं तिनें डोकं वर उचललं आणि विचारलं, "तुम्हीं कधीं आलांत ?"

"काल सकाळीं."

"आणि माझ्याशिवाय तुम्ही कुणाला भेटलां नाहीं ?"

"नाहीं. त्या तिथें एक घर आहे, आणि एक तर आणि कांहीं दुसऱ्या इमारती—" त्या बंगल्याच्या दिशेनें त्याने आपला हात हालवला— "पण तिथें कुणीही मानव प्राणी नाही. मी प्रत्येक वस्तूकडे सभोंवार पाहिलं; मग मी एका वाटेने इकडे खाली आलो; बस्स्, एवढचं ! छे; ह्या संपूर्ण बेटावर कुणी असेल असं मला वाटत नाहीं, श्रीमतीजी."

ती किंचित् हंसली; मात्र तिची मुद्रा जरा आतां थकल्यासारखी दिसायला लागली होती. मग ती म्हणाली, "जें घडतं तें घडवून आणण्याची परमेश्वराची स्वत:ची तऱ्हा असते, ॲलिसन महाशय. माझ्या सहाय्यासाठीं त्याने तुम्हांला पाठवलं."

या तिच्या उद्गाराचं ॲलिसनला मोठं आश्चर्य वाटलं. तिला मदतीची जरूर आहे असं त्याला मुळी सुद्धां वाटलं नव्हतं. आपल्या परिस्थितीवर तिचा पूर्ण ताबा आहे अशीच ती त्याला सर्वार्थाने दिसली होती. जेव्हां जेव्हां तो आपल्या परिस्थितीच्या विचारांत गुरफटून व गोंधळून गेला होता, तेव्हां तिच्या भविष्याचा त्याने मुळीच विचार केला नव्हता. आपल्या तुकडीपासून दूर आलेला, कदाचित् पळून जाण्याचा कोणताच मार्ग दृष्टिसमोर नसलेला, व बहुधा शत्रूच्या आवाक्यांत आलेला, असा आपण एक संयुक्त संस्थानांचा नौसैनिक आहोंत, असंच तो स्वत:ला मानीत होता. कांहीं अद्‌भूत घडल्याखेरीज त्याला फारशी आशा नव्हती आणि तें त्याला ठाऊक होतं. अद्‌भुतावर त्याचा क्वचितच विश्वास होता; त्याला आतां करतां येण्यासारखं एवढचं होतं कीं स्वत:ला जिवंत ठेवणे आणि शक्य होईल तोंवर शत्रूच्या तावडींत न सांपडणे. त्याच्या पलिकडे, कांहीं स्पष्ट दिसत नव्हतं आणि त्याचा विचार करण्याचे त्यानें साफ नाकारलं होतं.

त्या जोगीणीच्या साध्या बोलण्यानं हें सारं बदललं होतं. एक अमेरिकन नाविक गंभीर संकटांत असण्याऐवजीं, आतां एक अमेरिकन नाविक व एक जोगीण संकटांत होती. एखादी साधी मुलगी किंवा बाई असती तर त्याचं तिच्याबद्दल मन अधिक स्पष्ट राहिलं असतं. याने केवळ तिला आपल्या ताब्यांत घेतलं असतं आणि आपणा दोघां-



विणकाम प्रवीण म्हणून पहिलं बक्षीस मिळालंय् ना ग ?
मला वाटतं ते याच 'विण' काम प्राविण्यबद्दल असेल.





साठीं जें कांहीं करतां येणं शक्य होतं तें करायला त्याने एकदम प्रारंभ केला असता, पण ही जोगीण म्हणजे एक मोठं गूढ होतं. त्याला तिचा बोध होत नव्हता. जीवनाच्या धकाधकीपासून फार दूर रहाणारे नाजूक जीव म्हणजे ह्या जोगीणी असा आजवर त्याचा समज होता. गुप्त, शांत, पवित्र, अशा जागीं भितीपल्याड राहणाऱ्या जोगीणी म्हणजे विचित्र, गूढ प्राणी, पण त्यांच्यापैकीं एक इथें एकटीच या जंगलांत होती, प्रत्यक्ष युद्धाच्या व धोक्याच्या मध्यभागी आणि उघडपणे तिची अशी भावना होती कीं अमेरिकन नौदलांतील हा प्रायव्हेट हेन्री ॲलिसन, इथें परमेश्वरी करणीनेंच आणला गेला होता आणि तो सुद्धा केवळ तिला मदत व्हावी या हेतूने.

तो विचार प्रायव्हेट हेन्री ॲलिसनला सुखद वाटला नाहीं. तो उठला आणि आपले हात मागे घेऊन तो दारांतील खांबाला टेकून उभा राहिला.

"तुम्ही, श्रीमतीजी, " दृष्टि खाली वळवून तिच्याकडे पहात तो म्हणाला, "मी—मी—तुमच्यासारखं कोणी इथं भेटेल अशी अटकळ मुळींच केली नव्हती."

"मी सिंगापूरला होते." ती म्हणाली, मी आहे—अर्सूला संप्रदायांत माझा समावेश होतो. आम्ही शिक्षिका आहोंत आणि आम्ही गरीब व पीडाग्रस्त लोकांत काम करतो. आम्ही पांच जणी होतो. आम्ही चीन देशाला जात होतो. सिंगापूर सोडल्यावर दुसऱ्याच दिवशीं, समुद्रांतच विमाने आली आणि त्यानी जहाजावर बॉंबगोळे टाकले" ती थांबली आणि तिने खाली जमिनीकडे पाहिलं. मग ती पुढें बोलूं लागली "माझ्या जीवनांतील तो एक अतिविचित्र दिवस होता. जहाज जळूं लागलं, कांहीं बायका मुलांसह अधिकाऱ्यांनी आम्हांला एका नौकेंत घातलं आणि कांहीं थोडे पुरुष नौका वल्हविण्यासाठीं दिले. हें संध्याकाळचं घडलं. सारी रात्र तें पुरुष नौका हाकारीत होते.

"कुठच्या मार्गाने जायचं हें कुणालाच ठाऊक नव्हतं. एक दिवस आणि एक रात्र व आणखी एक दिवस गेला. त्यानंतरचं मला स्पष्ट आठवत नाहीं. कांहीं गरीब गुरीब मुलें मेली, आणि कांहीं लोकांनी समुद्रांत उड्या मारल्या. उष्णता विलक्षण वाईट होती. एका रात्रीं नौका किनाऱ्याला लागली आणि जे अजून जीवंत होते ते किनाऱ्यावर उतरले." तिने आपलं तोंड त्याच्याकडून दुसरीकडे वळवलं. व ती मूकपणे रडूं लागली. मग तिने स्वतःला सांवरलं आणि ती पुनः बोलूं लागली, "सकाळीं आम्हीं फादर जुआनला आढळलों. फक्त एक मनुष्य जिवंत होता तेव्हां. आणि पांच बायका आणि सहा मुलें आणि सिस्टर मर्सी आणि मी स्वतः मी आहे सिस्टर ॲंजेला. फादर जुआनने आम्हांला या मंदिरांत आणलं. इथें जवळच एक खेडें आहे. म्हणजे बॉम्बवर्षाव होण्यापूर्वी तेथें एक खेडें होतं. जहाजावरील कांहीं लोकांबरोबर मी इथें राहिलें. फादर जुआन आणि सिस्टर मर्सी मदतीसाठीं गेले होते तोंपर्यंत आम्ही रहायचं असं ठरलं होतं. पण जेव्हां दुसऱ्या दिवशीं सकाळीं मी उठलें तेव्हां मी एकटीच होते. ते लोक कुठें गेले, किंवा फादर जुआन आणि सिस्टर मर्सीचं काय झालं, हें मला ठाऊक नाहीं. तुम्ही आलांत तेव्हां ते परत येण्याची मी वाट पहात होते." ती स्तब्ध झाली.मग ती प्रार्थना करूं लागली.

तिला आणखी कांहीं सांगायचं आहे कां हें पहात ॲलिसन थांबला. त्याच्याजवळ बोलण्यासारखं कांहीं नव्हतं. ही लढाई होती. बोलण्यासारखं कांहींच नव्हतं. अशा गोष्टी घडायच्याच. नाविकांच्या तुकडींतून तो एकटाच उरला होता. दुसऱ्या एका प्रकारच्या गटांतून ती एकटी उरली होती. असे लोक भेटतात तेव्हां शब्द अपुरे पडतात; तिथें सहानुभूति होती, पण ती सहानुभूति शब्दांनी बोलकी होणारी नव्हती.

क्षणार्धांतच त्याने विचारलं, "ते लोक गेल्यावर तुला कुणीच आढळला नाहीं कां ?"

"तुम्ही येईपर्यंत कुणीच नाही. "

"आणखी कांहीं काळ तरी आपण इथें राहूं असं दिसतं."

"मला ठाऊक आहे...."

संतत संथपणे कोसळणाऱ्या पावसाकडे नजर लावीत, पुनः ती दोघं निःशब्द झालीत.

[क्रमशः]



अनुक्रमणिका







(पान १० वरून)

"मी प्रयत्न सोडणार नाहीं—" तो.

लीलाताईच्या यजमानांनीं दार उघडलें. लीलाताईनीं त्याला रहाण्याचा आग्रह केला. पण ज्या टांग्यानें ती दोघं आली होती त्याच टांग्यानें तो परत निघाला. टांग्यांत बसतांना त्याची नि वासंतीची सहज दृष्टा दृष्ट झाली. मामा नि मामी आंतील बाजूला होती.

"माझ्याबद्दल तुला कांहींच वाटत नाहीं ?—तुझ्याकरितां मी वाटेल तें दिव्य करायला तयार आहे–" असेंच जणूं तिचे ते बोलके डोळे सांगत होते.

टांग्यांत चढतांना त्यानें वासंतीचा मांसल हात थोडा दावला व तो झटकन् टांग्यांत चढला. आपण वासंतीला कांहीं तरी सांगावें, थोडासा आधार द्यावा, किंचितशी आशा दाखवावी असा विचार त्याच्या मनाला चाटून गेला. पण तो अगदी थोडाच क्षण टिकला. दुसऱ्याच क्षणी त्यानें आपली मान झटकली.

"आतां लवकरच लाडूं मिळूं देत–" असें कांहींतरी बोलून त्यानें तिचा निरोप घेतला.

टांगा चालू झाला झाला नि विचाराच्या शिघ्रतेनें त्याचे डोकें आणखीन् दुखूं लागलें. कानांचीं टोकें अगदी लाल झाली. आपल्याला ताप विप भरणार कीं काय अशी शंका त्याला आली. पण पावसाच्या पाण्यानें त्याचे अंग मुळीदेखील भिजले नव्हतें.

तो जेमतेम बारा वाजतां स्टेशनमध्यें पोंचला. घाईघाईनें प्लॅटफॉर्मपर्यंत पोंचला. पण शेवटची गाडी नुकतीच सुटली होती.तिचे लाल दिवे अंधारांत चमकत चमकत नाहींसे झाले होते.

"ही गाडी चुकायला नको होती. आतां पहाटे चारपर्यंत गाडी नसणार–" तो स्वत:शीं पुटपुटला. आणि बाजूच्या रिकाम्या बाकावर बसला. अगदीं टोंकाला. बाकावर कोणीतरी झोंपले होते. डोक्यावरून चादर ओढून घेऊन. त्याला थोडी थंडी वाजली. पण अंगांत टेरेलीनचा साधा बुश शर्ट होता. स्टेशनांतील एक एक दिवे मालवले गेले. हॉटेल बंद झाले व रेल्वेचा एक पोलीस त्याच्या अंगावरून पहात पहात गेला. आतां चार तास बाकावर अवघडून काढावे कीं लीला-ताईकडे – वासंतीकडे परत जावें हा प्रश्न पडला. त्याचे विचारचक्र जोरांत सुरूं झालें–

आतां सकाळीं जाऊन काय करणार ? उद्यां पहिल्या प्रथम रिटाला गांठायचें. तिला साफ साफ सांगून टाकायचें कीं असला चावटपणा बस्स झाला ! विमा कंपनीनें जी जागा देऊं केली आहे ती पसंत करायची नि तिथं दोघांनीं मिळून सुंदरसा संसार थाटायचा. संगीताचे, नाटकांचे नि रात्रीं अपरात्रीं भटकण्याचे कार्यक्रम बस्स झाले. आतां जीवन कसें शांत, सुखी, आखीव रेखीव मार्गानें जाऊं द्यायचे ! कसली धांदल नको की काळजी नको ! आणखी चार वर्षांत मॅने-जरची जागा नक्कीच मिळणार. मग आपल्याला मोटार घ्यायची. मोटारींत बसून संबंध हिंदुस्थानचा दौरा करायचा. कन्या कुमारी-पासून तो काशी काश्मीरपर्यंतचा मुलूख पाहायचा. मजा करायची. जमलं तर एखादी फॉरिनची ट्रिप दोघांनीं मिळून मारायची.चार वर्षं मजा लुटायची. मग संसार वाढला, त्यात एखाद्या गोजीरवाण्या बाळाची भर पडली तरी हरकत नाहीं ! पण चार वर्षें मात्र अगदी दोघांनीं मिळून. तूं आणि मी. मी आणि तूं.

पण सकाळी उठून तिच्याकडे गेल्यावर आणि थोडे सूतोवाच केल्यावर जुणूं कांहीं आदल्या रात्रीं कांहींच घडलें नाहीं. आणि जुहूला जें कांहीं केलें ती निव्वळ गंमत होती, तूं नसती शंका घेऊं नकोस, नाटकांतील खलपुरुषाप्रमाणें वागूं नकोस असा तिनें आपला हट्ट चालविला आणि ती म्हणाली की मी आधी संगीत आणि नाटकाची राणी होणार, सारे जग जिंकणार, कलेची सेवा हेंच माझें जीवन, हाच माझा आनंद, विवाहाच्या बंधनात मी स्वत:ला अडकवून घेणार नाहीं असा पेंच तिनें टाकला तर आणि ती म्हणाली सांताक्रूझ-मधील अशा ठोकळेबाज इमारतीत एखाद्या पत्र्यावजा चार खोल्यांत रहाण्यापेक्षां हौशी रसिकांच्या आश्रयानें आलिशान बंगल्यांत नि हॉटेलमध्यें राहणें आणि देशभर विमानानें हिंडून मजा करणें हेंच माझे जीवनाचे सार नि तत्वज्ञान तर मग आपण त्याला काय करणार आणि ती आपल्या डोळ्यादेखत जसवंतरावच्या गाडींत चढून परत नाटकाच्या तालमीला जाणार नि गाण्याच्या नादांत धुंद होणार तर मी आपल्या स्वप्नांत रंगविलेली ती रिटा नाहींशी होऊन सुहासिनी म्हणूनच तिला आपण कसे जवळ करणार नि ती आपणाला कसे ओळखणार हा खरा प्रश्न आणि तो सुटणें शक्य नाहीं. कारण रिटाचे पूर्वीचे व्यक्तिमत्व जाऊन तिच्यांत नव्या आशा आकांक्षा भरल्या होत्या नि तिच्या नीती अनीतीच्या व प्रेमाच्या कल्पना पूर्ण बदलून गेल्या होत्या कीं त्याने आता नेहमीचा गोडवा, जिव्हाळा, आपलेपणा उरला नव्हता आणि सुहासिनीप्रमाणें रमेशचा एखादा उमेशक किंवा दिलीपकुमार होणार नव्हता कारण बापानें केलेलें कर्ज त्याला फेडायचें होतें. व त्याकरितां त्यानें स्वखुषीनें नोकरीचा पेशा पत्करला होता. व त्यांत आतां केलेली सेवा निव्वळ प्रेक्षक म्हणूनच करायची उरली होती आणि त्यानें त्या बाबतींत परत चेहऱ्यावर कधी रंगरंगोटी केली नव्हती की नाटकांतला नायक म्हणून तो परत रंगभूमीवर आला नव्हता. कारण कॉलेजांतील तें स्वप्नाळू जग सोडून तो दुसऱ्या वातावरणांत गेला होता व त्याचे पंख तुटून तो आतां जमिनीवर सरपटत चालणारा प्राणी झाला होता व रिटाला ते पंख फुटून ती आकाशाने उड्डाण करीत होती, चक्रें फिरत होती, मोठे आवाज होत होते, त्यात गति होती...

अहो, महाशय ! आतां सकाळीं चार वाजतां या–इथं तुम्हाला बसतां येणार नाहीं–" स्टेशनमधील रखवालदारानें त्याला त्याच्या तंद्रींतून जागे केलें.

"खरंच ! मी जातो हं—" असं म्हणून तो परत बाहेर पडला. बाहेर टांगा एकही दिसत नव्हता.

चिखल तुडवीत अर्धा तासानें तो लीलाताईच्या घरापाशीं पोंचला. दार वाजवतांच लीलाताईनीं स्वत:च दार उघडलें. वासंती जागीच होती.

"गाडी चुकली–मग आलों परत–" तो एवढेंच म्हणाला.

"छान आता तुझी सोय करते हं." असें म्हणून लीलाताई आंतल्या खोलींत गेल्या.

"बरं झालं परत आलास— मी तुमच्याबरोबर खालीं येईन. सकाळीं येईन मुंबईला चालेल ना"– तिनें विचारलें.

"अगदीं खुशाल," तो तिच्याकडे पाहून हंसत म्हणाला.

"म्हणजे गाडी चुकली ती तुझी नव्हतीच तर–" तिनें खिजविलें.

"हं ! प्रवासाच्या घाईंत मनुष्य असला की दिसेल त्या गाडीत चढावसं वाटतं.. पण सगळ्याच गाड्यांत हल्लीं गर्दी भयंकर——" तो.

"तूं आतां या गाड्यांच्या भानगडींतच पडूं नकोस. उद्यां सकाळीं आपण इथून जाऊं... तो तुझा ब्लॉक दाखव मला आधी–" ती म्हणाली.

त्यानें तिच्या गालावर चापटी मारली. तेवढ्यांत लीलाताईनी एक सतरंजी व गादी आणली.

डोळे मिटून जागरण करीत त्यानें सकाळपर्यंतचा वेळ काढला. सकाळीं उठून वासंतीला घेऊन तो प्रथम सांताक्रूझला गेला आपली नवी जागा दाखवायला.

● ● ●





“बाराबस” चित्रपटांतील एक हृदयस्पर्शी प्रसंग






## एक संस्मरणीय चित्र
# “बाराबस !”

**नोबेल** पारितोषिक विजेते जगप्रसिद्ध लेखक लॅगरक्विस्ट ह्यांच्या '**बाराबस**' या गाजलेल्या कादंबरीवरून तयार झालेला कोलंबिया चित्र संस्थेचा हा अभूतपूर्व असा महान चित्रपट मुंबईस रेक्स सिनेमा-गृहांत दोन एप्रिलपासून दाखल होत आहे.

हॉलिवूडच्या यंदाच्या 'ऑस्कर' पारितोषिकाच्या चढाओढींत हा चित्रपट अखेरच्या निवडींतील पहिल्या दोन नांवापर्यंत येऊन थडकला आहे हें चित्ररसिक जाणतातच.

ही कादंबरी जेव्हां प्रसिद्ध झाली तेव्हां जगांतील अनेक भाषांमध्यें तिचे अनुवाद प्रसिद्ध होण्यास सुरवात झाली. ऊंच अशा बौद्धिक पातळीवरून लिहिलेल्या या कादंबरीचा खूप बोलबाला झाला. 'एका प्रतिभाशाली कलावंतानें रचिलेलें महाकाव्य' अशी या कादंबरीची स्तुति सर्व जगामध्यें होऊं लागली. ह्या कादंबरीवरून चित्रपट तयार करणें म्हणजे तो केवळ ऐतिहासिक धार्मिक प्रेमकथेच्या स्वरूपाचा अगर रहस्यमय अशा ठोकळेबाज प्रकारांतील चित्रपट निर्माण करणें नव्हतें ! कथाविषयाची ऊंची कायम राखून चित्रनिर्मिती होणें आवश्यक होतें. म्हणूनच या चित्रपटाचे निर्माते डीनो लॉरेन्टिस ह्यांनीं बाराबस ही प्रमुख भूमिका साकार करणारा कलाकार आणि हेतुप्रधान चित्र कौशल्यानें हाताळणारा दिग्दर्शक ह्या दोन निवडीविषयीं विलक्षण चोखंदळपणा दाखविला. त्यांनीं केलेली निवड किती अचूक ठरली हें आतां कालानेंच सिद्ध केलें आहे !

बाराबस ही प्रभावी भूमिका आपल्या अभिनयसामर्थ्यानें सत्य स्वरूपांत प्रकट करणारा महान अभिनेता **अॅन्थनी क्वीन्** आणि **रिचर्ड फ्लेशर**सारखा प्रज्ञावंत दिग्दर्शक ह्या जोडगोळीनें 'बाराबस' हा चित्रपट एकदम आघाडीवर आणून ठेवला आहे. 'कंपल्शन' आणि 'व्हाईकिंग्ज !' हीं दोन चित्रें या दिग्दर्शकानें नुकतीच गाजविलीं आहेत. 'बाराबस' हें चित्र आतां त्याच्या दिग्दर्शन कौशल्याच्या कीर्तीवर कळस चढविणार आहे ! त्याचप्रमाणें अॅन्थनी क्वीन् ह्या कलावंताला 'बाराबस' इतकी मनोहर रंगतदार आणि अभिनयगुणास वाव देणारी भूमिका पुन्हां आयुष्यांत करावयास लाभेल किंवा नाहीं याची शंकाच आहे !

अॅन्थनी क्विन् या चित्रपटांत आपणांस एका अट्टल बदमाष चोराच्या भूमिकेंतून दिसणार आहे. परंतु हा चोर म्हणजे आपला नेहमींचा एक चलाख 'चालू' चोर नाहीं तर हा कुप्रसिद्ध असा चोर 'गुन्हेगार' म्हणून ज्या कैद्यांच्या रांगेमध्यें उभा आहे त्यामध्यें खुद्द येशू ख्रिस्ताला अपराधी म्हणून उभे केलेलें आहे !

रोमन साम्राज्यामधील करमणुकीचे क्रूर खेळ, विलासी जीवन आणि अंधाधुंदी दाखविणाऱ्या ह्या चित्रांत एक चटका लावणारी घटना दाखविण्यांत आली आहे. त्याकाळच्या परंपरेप्रमाणें वर्षांतून एक दिवस असा येई कीं कितीही भयंकर स्वरूपाचा गुन्हा केलेला कैदीसुद्धां सार्वमत अनुकूल पडलें तर बिनशर्त मुक्त होई ! या प्रथेस अनसरून 'बाराबस' या अट्टल चोराला मुक्त करण्यांत येतें तर लोककल्याणाची भावना मनामध्यें अहर्निश बाळगणाऱ्या येशू ख्रिस्ताला फांसावर चढवावें अशा जनसमुदायाच्या घोषणा होतात आणि ह्या दोन्ही गोष्टींची अंमलबजावणी सुद्धां ताबडतोब होते ! चोराला सोडून देण्यांत येते आणि संन्याशी संताला फांसावर चढविण्यांत येते ! जगाची ही अशी उलटी रीत आहे !

ख्रिस्तवधानंतर बाराबस या मूळच्या बदमाषाच्या अन्तर्मनांत जो संघर्ष होऊं लागतो त्या यातनांमुळें शाश्वत अशा सत्याकडे—मांगल्याकडे त्याचें मन कसें ओढ घेतें याचेंहि चित्रण मोठ्या हळुवारपणें आणि परिणामकारक अशा पद्धतीनें घेतलें गेलें आहे.

भव्य देखावे, जरतारी कपडे, शस्त्रास्त्रें या वातावरणास पोषक असणाऱ्या साऱ्या गोष्टींवर अतोनात पैसा खर्च केला गेला आहे. ख्रिस्तवधाच्या चित्रिकरणासाठीं रोमःपासून १२० मैलांवर एक मनोहर ठिकाण निवडण्यांत येऊन हजारों एक्स्ट्रॉ कलाकार तिथें नेण्यांत आले. शूटींगची मौज पहाण्यासाठीं म्हणून सभोवती इटली देशांतील शेकडों शतकरी कुटुंब मोठ्या कुतूहलानें जमा झालीं होतीं. परंतु ख्रिस्तवधाच्या चित्रणाच्या वेळीं तीं भोळीभाबडीं माणसें गुढघे टेकून रडत रडत प्रार्थना म्हणूं लागली. ख्रिस्ताला सूळावर चढविल्यानंतर 'सूर्य निस्तेज झाला—' 'आसमंतात अंधःकार



अनुक्रमणिका





पसरला' अशीं वर्णनें आहेत. म्हणून या प्रसंगाची चित्रिकरणाची योजना नेमकी सूर्यग्रहणाच्या दिवशीं करण्यांत आली. हा प्रसंग फारच करुणरम्य आणि भावनामय असा झाला आहे.

रोमन सर्कस म्हणजे आखाड्यामधील शूर योद्धांच्या झुंजी, घोड्याच्या शर्यती, निरपराध गुलामांच्या कत्तली, इत्यादि चित्तथरारक प्रसंग परिणामकारक पद्धतीनें चितारण्यांत आले आहेत. शेतमजूर आणि गंधकाच्या खाणींमधील मजूर म्हणून वेठीस लावलेल्या गुलामांना करावे लागणारे अनन्वित शारीरिक श्रम आणि त्याच वेळीं त्यांना मिळत असणारी पाशवी वागणूक पाहिल्यानंतर प्रेक्षकांची अन्तःकरणें पिळवटून निघतील !

खरोखर चित्रपटसृष्टीच्या इतिहासांत 'बारावस' हें एक संस्मरणीय असें चित्र ठरेल !

**

## एक आगळी कथा
# "दी यलो रोल्स रॉईस !"

**मेट्रो** गोल्डविन मेयर चित्रसंस्थेतर्फे 'दी यलो रोल्स रॉईस' हें एक मोठें गंमतीदार रंगीत चित्र मुंबईच्या मेट्रो या आलीशान चित्रगृहांत रूजू होत आहे.

'प्रेम' कुठें बसेल केव्हां बसेल आणि कुणावर बसेल हें या जगांत एक न उलगडणारें कोडें आहे ! हें चित्रसुद्धां प्रथमदर्शनी प्रेमाची महति गाणारें आहे ! या प्रेम-महात्म्यांतील नायिका सौंदर्यशालिनी आहे, रूपगर्विता आहे हें खरें परंतु ती 'स्त्री' मात्र नाहीं ! ती एक बादशाही 'रोल्स रॉईस' गाडी आहे ! पिवळ्या रंगामुळें ती एकदम एवढी वेगळी लोभनीय आकर्षक वाटतें कीं ती आपल्या मालकीची व्हावी म्हणून कथानकांतील पात्रें तिला पहातांक्षणींच अगदीं वेडीं होतात — बेभान होतात !

शोकेसमध्यें ठेवलेली ही मोहक कोरी करकरीत गाडी लॉर्ड फिन्टॉन (रेक्स हॅरीसन) ह्या बड्या व्यक्तीचें लक्ष वेधून घेते. आपल्या मोहक डौलानें आणि तेजानें ही गाडी त्याच्यावर जबर मोहिनी घालते इतकेंच नव्हे तर तो प्रथमदर्शनींच तिच्या प्रेमांत पडतो. आपल्या लग्नाच्या वाढदिवशीं आपल्या प्रिय पत्नीला द्यावयास हें गोड 'बक्षिस' किती अनुरूप ठरणारें आहे अशा आनंदात तो त्याच क्षणीं ती गाडी विकत घेतो.

त्याची प्रिय पत्नी हें अपूर्व असें बक्षीस आनंदानें स्वीकारते खरी परंतु त्याच गाडीचा उपयोग मात्र पुढें मोठ्या विचित्र तऱ्हेनें होऊं लागतो कीं लॉर्ड फिन्टॉन अगदीं हतबुद्ध होतो. एके दिवशीं गाडीचा दरवाजा उघडून तो आंत पहातो तो त्याची सौंदर्यवति पत्नी एका प्रियकराच्या मिठींत !

ही गाडी विक्रीसाठीं म्हणून शोकेसमध्यें पुन्हा दाखल होते तेव्हां एक आंतरराष्ट्रीय गुन्हेगारांच्या टोळीमधील पाओलो (जॉर्ज सी. स्कॉट) म्हणून एक बडे प्रस्थ आपल्या प्रिय पात्राच्या (शर्ले मॅक्लीन) केवळ हट्टामुळें ही गाडी विकत घेतो. परंतु ही गाडी मालकाला धार्जिणी रहात नसल्यानें त्याचीहि प्रियतमा तिसऱ्याच एका तरुणावर अनुरक्त आहे असें पाहिल्यावर गाडीची रवानगी मोटारच्या दलालाकडे होते.

तिसऱ्या खेपेस या गाडीचें धनीपण मिसेस मिलेट (इनग्रिड बर्गमन) ह्या धनवान स्वच्छंदी सुंदर स्त्रीकडे येते. त्यावेळेस दुसऱ्या महायुद्धानें साऱ्या जगाला ग्रासलेलें असतें. मिलेट बाईना इटलीमधून युगोस्लोव्हाकियास जावयाचें होतें. तेव्हां डेव्हिच (ओमर शेरीफ) ह्या स्वातंत्र्य-सैनिकाला एक वाटसरू आहे अशा समजुतीवर ती त्याच्या देशांत गुप्तपणानें जाण्यास मदत करते. नंतर पुढें समजून येतें कीं तो एक देशभक्त आहे. तेव्हांपासून क्रांति सैनिकांना महत्त्वाच्या आणि मोक्याच्या ठिकाणीं गुप्तपणें घेऊन जात रहाण्याचें राष्ट्रीय स्वरूपाचें कार्य ही गाडी करीत असतांना मिलेट बाई त्या सेनानायकांवर अनुरक्त होते.

'अँथनी अॅस्क्वीथ' ह्या जुन्या आणि जाणत्या दिग्दर्शकानें हे सारे प्रसंग अतिशय कौशल्यानें हाताळले आहेत. रेक्स हॅरीसन हा चित्रतारा आणि इन्ग्रिड बर्गमन, शर्ले मॅक्लीन ह्या चित्रपटतारका ह्या चित्रपटांत मोठ्या दिमाखानें चमकत असून कथाविषयांतील नाविन्यामुळें हें चित्र रसिकांच्या मनास चटका लावील यांत संशय नाहीं !

— चित्रगुप्त

" पिवळ्या रोल्सरॉईसमधील भानगडींतील प्रमुख पात्रें "






# यशवन्त आहांत ! “यशवन्त” व्हा !

**भारताचे** संरक्षणमंत्री ना. यशवन्तराव चव्हाण ह्यांचा ५१ वा वाढदिवस नुकताच मोठ्या थाटांत साजरा झाला. हा सोहळा महाराष्ट्रांत व्हावा. मुंबईंत मोठ्या प्रमाणांत साजरा व्हावा हें सर्वस्वीं स्वाभाविक व उचितच होतें. कारण एकतर वाढदिवस आपल्या घरीं, आपल्या माणसांत आणि आपल्या माणसांनीं साजरा करावयाचा असतो. तसा तो साजरा झाला आहे. कारण आधुनिक महाराष्ट्राची जडणघडण यशवंतरावांच्या साक्षीनें मुंबईतच सुरू झाली आहे. तिचा विकास त्यांच्याच साक्षीनें होत आहे. त्यांच्या नेतृत्वाची प्रत्यक्ष योजना जरी दिल्लींत झालेली असली तरी यशवन्तराव मनानें मुंबई-महाराष्ट्रांतच वावरत आहेत. महाराष्ट्रांतल्या बारीक सारीक घटनांकडे त्यांचें जातीनें लक्ष असतें. आणि त्यांत ते रस घेत असतात. यशवंतरावांचें नेतृत्व हें स्वयंसिद्ध नेतृत्व आहे. कांहीं कांहीं माणसांची कसोटी संकटांत आणि संघर्षातच लागत असते. यशवंतराव चव्हाणांचें नेतृत्व असेंच संघर्षातच वाढलें आणि त्यानें कसोटी दिली तीही संघर्षकालांतच ! आणि आज त्यांच्या नेतृत्वाला पंडितजींनी मान्यता देऊन तर तें अधिक उजळून टाकलें आहे. महाराष्ट्राच्या आंदोलनांत यशवंतराव एकदम पुढें आले. पण नेतृत्व असें एकदम धूमकेतूसारखें उगवत नाहीं. त्याची जडणघडण वर्षानुवर्षे होतच असते. संस्कार, अभ्यास–चिंतन, मनन यांतून ती होत असते. तशी ती झालेली नसते तेव्हां लादलेलें नेतृत्व हें क्षणांत उन्मळून पडतें. पण व्यासंगी नेतृत्व अनेक संकटें पचवूनही नीलकंठाप्रमाणें उभें राहते. यशवंतराव चव्हाण यांनीं रॉयसारख्या राजकीय वेदान्ती माणसाच्या प्रत्यक्ष व राजकीय सहवासांत काळ कंठला. देशाच्या राजकीय चळवळींत भाग घेतांना केवळ भावनिक उद्रेकानें तो घेतला नाहीं तर त्या मागल्या प्रेरणांचा सूक्ष्म अभ्यास केला. ‘देशभक्ति’ ही मुख्यतः भावनिक बाब असली तरी तिला अधिष्ठान मात्र व्यवहाराचेंच लागतें ही गोष्ट त्यांनीं कधीं नजरेआड होऊं दिली नाहीं. “**शक्ति युक्ति जिये ठायीं, तेथें श्रीमंत नांदती**” हें समर्थ वचन त्यांनीं कधीं नजरेआड होऊं दिलें नाहीं. नेतृत्व करतांना त्यांनीं तें सोडलें नाहीं. म्हणूनच द्विभाषिकाचें राज्य चालवीत असतांना व त्यानंतरही त्यांच्या नेतृत्वानें कधीं पराभव पत्करला नाहीं. संयम, अंतःकरणाची ऋजुता, आपल्या कार्याविषयींची स्पष्ट व स्वच्छ कल्पना, त्यावर लक्ष केंद्रित करून कामें करण्याची त्यांची हातोटी ह्या गुणांचा कस त्या काळांत लागला. समितीची शक्ति आणि तिच्या मर्यादा ह्यांची यथायोग्य जाणीव यशवंतरावांना होती. राजकारणांत कांहीं वेळां फार मोठ्या लाभासाठीं कांहीं लहान गोष्टी सोडाव्या लागतात ह्याची त्यांना जाणीव होती. स्वतःच्या कर्तृत्वाबद्दलचा योग्य आत्मविश्वास ही त्यांची खास कमाई आहे. प्रतापगडच्या मोर्चाचे वेळीं जी समयज्ञता, संयम त्यांनीं दाखविला त्याला तोड नाहीं. त्यावेळीं आणखी कांहीं हुतात्मे होण्याची शक्यता होती. वातावरण तापले होतें. तापविलें जात होतें. गांधीवधानंतरच्या काळाच्या आठवणींच्या खपल्याही पुन्हां काढल्या जात होत्या. मोर्चा जसजसा जवळ येत चालला तसतशी उत्कंठा ताणली जात होती. पण पंडितजी आले. त्यांनीं प्रतापगडच्या शिवप्रतिमेचें अनावरणही केलें. मोर्चाही पार पडला. रक्ताचा एकही थेंब न सांडतां हें घडले. आणि यशवंतरावांच्या कर्तृत्वाचे एक सुवर्णपान लिहिलें गेलें असें मला वाटतें. मराठी माणसें मुंबईची वाट लावतील, त्यांना हें राज्य यशस्वीपणें चालवितां येणार नाहीं, वगैरे शंका व्यक्त होत होत्या. कर्तृत्ववान माणसें आपलें कर्तृत्व कृतीनें सिद्ध करतात. बोलून नव्हे ! चव्हाणांनीं ह्या वादंगांत कधी भाग घेतला नाहीं. पण द्विभाषिकाचे राज्य त्यांनीं अतिशय आत्मविश्वासानें चालविलें आणि राज्यें निर्मिण्याची, चालविण्याची ऐतिहासिक परंपरा आम्हीं अजून गमावली नाहीं हें सिद्ध केलें.

चव्हाणांच्या नेतृत्वांतला आणखी एक विशेष मला येथें नमूद करावासा वाटतो. लोकमान्यांच्या नेतृत्वांत तो विशेषत्वानें जाणवत असे. नेतृत्व हें केवळ राजकीय असत नाहीं. त्याला विविधरूपें असावी लागतात. रंग असावे लागतात. ह्या वृत्तींतूनच ‘बालगंधर्व’ ही पदवी जन्म पावली. काकासाहेब खाडिलकर, तात्यासाहेब केळकर, दादासाहेब खापर्डे, शिवराम म. परांजपे, आगरकर यांसारख्या ललित प्रकृतीच्या माणसांची कलासाधना जोपासली गेली. तिला प्रोत्साहन दिलें गेलें. नाटक, गणपती उत्सव, शिवाजी उत्सव यासारख्या माध्यमांतून जनजागृतीचें कार्य केलें गेलें. चव्हाणांच्या व्यक्तित्वांत ह्याचा संगम झाला आहे. त्यामुळें महाराष्ट्राच्या भावजीवनाशीं संबंधित असलेल्या सर्व गोष्टींशी चव्हाणांचा फार जवळचा संबंध आहे. तो संबंध लादून घेतलेला नाहीं. तर तो उत्स्फूर्तरीत्या आलेला आहे. साहित्य संमेलन, नाट्यसंमेलन, नाट्य दर्शनाच्या कार्यक्रमांत चव्हाणांची जीं भाषणें मी ऐकलीं आहेत त्यांतून मला हेंच जाणवलें आहे. घटना, गोष्टी लहानसहान असतात. पण त्याकडे राज्यकर्त्या नेत्यानें बारकाईनें लक्ष द्यावयाचें असतें. असें साक्षेपी पाहणें चव्हाणांच्या जवळ आहे. प्रसन्न व्यक्तित्व आणि प्रसन्नवृत्ति त्यांच्याजवळ आहे. विरोधी पक्षांतलीं माणसें नेहमीं विरोधी वा शत्रुवत् मानली पाहिजेत असें ते मानीत नाहींत. ह्या त्यांच्या वृत्तींतूनच ते हुतात्मा स्मारकाच्या सभेंत उपस्थित राहून देणगी देऊं शकतात वा गेटवे ऑफ इंडियावरच्या शिवप्रतिमेच्या अनावरण प्रसंगीं आचार्य अत्र्यांना आपल्या शेजारीं घेऊन बसूं शकतात. हजरजबाबी व रोखठोक उत्तरें देऊनही परमत सहिष्णुता बाळगणें त्यांना जमतें–आणि म्हणूनच चव्हाणांच्या कारकीर्दींत वातावरण तापलेलें असूनही विधानसभा वा महाराष्ट्र राज्य शांत होतें. भारताचे संरक्षणमंत्रिपद त्यांना लाभले ते त्यांच्या ह्या थोर नेतृत्वगुणांतूनच !

चव्हाण दिल्लीला गेले. आणि प्रत्यक्ष लढाई थांबली. पण आक्रमित राष्ट्र हें नेहमींच युद्धमग्न (**at war**) असें असतें–असावें लागते. कारण आजची युद्धकल्पना फार बदलून गेली आहे. प्रत्यक्ष युद्ध चालू नसूनही राष्ट्रें युद्धमान असूं शकतात. चीननें युद्ध थांबविलें असलें तरी त्यानें चालविलेली राजनैतिक लढाई थांबविलेली नाहीं. उलट, पाकिस्तान, नेपाळ, तिबेट ह्यांचा उपयोग करून घेऊन व दक्षिणेकडे सीलोन, केरळ वगैरेंत विरोधी जाळें पसरून तो फार मोठ्या युद्धाची तयारी करीत आहे. आफ्रो-आशियाई नेतृत्वापासून भारताला वंचित करून एकाकी पाडण्यांत चीन आज यशस्वी झाला आहे. काश्मीरविषयक परिस्थितीही स्फोटक झालेली आहे. अशा परिस्थितींतून यशस्वीपणें पार पडण्यासाठीं कणखर अशा नेतृत्वाची आज गरज आहे. कणखर नेतृत्व कणखर बुद्धीतून येतें. आणि




अनुक्रमणिका

कणखर बुद्धि ही संकटांचे लोखंडी चणे पचविणाऱ्यांना प्राप्त होते. यशवंतराव चव्हाण संरक्षणमंत्री झाल्यानंतरच्या काळांत संरक्षण-विषयक विश्वास वाढला असला तरी चीनचें आक्रमण झाल्यानंतरची परिस्थिती अजूनही कायम आहे. एकही इंच चीन मागें हटला नाहीं कीं, आम्हीं पुढें गेलों नाहीं. ही परिस्थिती कायमच राहिली तर राष्ट्रीय निर्धाराला (पार्लमेंटनें व्यक्त केलेल्या) तडे जाण्याची शक्यता आहे. कदाचित आक्रमणाची विस्मृति त्यांतून येईल. म्हणूनच यशवंतरावांच्या नेतृत्वानें यशाविषयींचा विश्वास वर्धिष्णु होईल अशा कृतींचा प्रत्यय दिला पाहिजे. त्यांच्या ५१ व्या वाढदिवसानिमित्त त्यांचें अभिनंदन करतांना मी असेंच म्हणतो कीं, यशवंतरावजी, आपण 'यशवंत' आहांतच. पण खऱ्या खुऱ्या अर्थानें "यशवंत" व्हा ! आपणही वलदण्ड व्हा आणि आम्हांलाही वलदण्ड करा.

☆

## महाराष्ट्राचा वाल्मिकी

**कांहीं** कांहीं माणसें सुवर्णस्पर्श लेवून ह्या जगांत येतात. कधीं कधीं तो स्पर्श सुरांचा असतो, कधीं नादांचा असतो. कधीं रंगांचा असतो. कधीं तालाचा असतो. कधीं त्याच्या स्पर्शानें शब्दांतून सुधा पाझरते तर कधीं कधी त्या स्पर्शानें सुरांच्या माध्यमांतून यक्षगंधर्व पृथ्वीवर गावूं लागतात. कधीं निर्जीव रंगांतून सशरीर, सजीव कला आविष्कृत होते तर कधीं कधीं त्या स्पर्शांतून साकार होते एक महान तत्वज्ञान ! पण ह्या स्पर्शांनीं तें तें जीवन उजळून निघते. तें तें गांव तो प्रांत, तो देश ह्या साऱ्यांना एक प्रकारची तेजस्विता प्राप्त होत असते – मराठी साहित्याच्या क्षेत्रांत असा प्रतिभेचा स्पर्श झालेली अनेक माणसें आहेत, होती व यापुढेंही प्रकाशांत येतील त्या माणसांच्या मुखांतून पाझरते अमृत-गंगा ! आणि लेखणी लिहून जाते सं–जीवक साहित्य ! जीवनांतली अशुचिता त्यांच्या पदस्पर्शानें जळून जाते. आणि त्यांच्या नुसत्या असण्यानेंही मानववंश धन्य होतो. कलेच्या क्षेत्रांतले हे योगी, साधक ही त्या त्या समाजाची संपत्ति असते. ती संपत्ति आहे ह्याची जाणीव रसिक मनांनी ठेवली पाहिजे.

**ग. दि. माडगुळकर** ह्यांच्याबावत सुदैवानें असेंच म्हणतां येण्यासारखें आहे. माडगुळकरांच्या प्रतिभेनें मराठी साहित्य क्षेत्रांत एवढी मोठी झेंप घेतली आहे कीं, मराठी साहित्याचा अभ्यास करतांना त्यांचें नांव वगळतां येणार नाहीं. माडगुळकर हे कवि आहेत कीं नाहींत याविषयीं मध्यंतरी 'मौजे'त एक पत्र प्रसिद्ध झाले होते. मौजेचें (व त्या पत्र लेखकांचे) मन कांहींही असो. मी त्यांना कवि मानतो. नुसतें 'गीतरामायण' हें दीर्घकाव्य त्यांनीं लिहिलें असते तरीही त्यांना मी कवि म्हटलें असते. कारण **"कविता म्हणजे संसृति-टीका"** वा भावनांचा उत्स्फूर्त आविष्कार हें जर आपण काव्याचें कांहीं लक्षण मानीत असूं तर तसा तो आविष्कार त्यांच्या गीत-रामायणांत दिसतो. "वाक्यं रसात्मकं काव्यम्" अशी कवितेची व्याख्या गृहित धरली तरीही तें मोठें काव्य ठरेल कारण त्यांत विविध रसांची कारंजीं उडतांना दिसतात. काव्य आणि तत्वज्ञान ह्यांचा मनोहर संगम म्हणजे गीतरामायण ! गीतरामायण ऐकलें नाहीं असा महाराष्ट्रीय मिळणें कठीण ! सबंध वातावरण धुंद होते. त्यांत सुधीर फडके यांचे सूर आणि माडगुळकर यांचे शब्द यातला अभेद जस जसें ऐकत जावे तसतसा जाणवत जातो. एका फार उच्च, उदात्त वातावरणांत हेलावत हेलावत माणूस घरीं येतो. प्रसंगांची निवड सुद्धां अशी कुशलतेनें केलेली दिसते (किंवा झालेली दिसते) कीं मन थक्क होतें.

'गीतरामायण' हें दीर्घकाव्य लिहून 'माडगुळकर' हें नांव मराठी साहित्यांत कायमचें कोरलें गेलें असतें असें कांहींचें मत आहे. पण माडगुळकरांची प्रतिभा मोठी आहे. ती चतुरस्र आहे. मराठी चित्रपट व्यवसायांत तर माडगुळकर हे 'दादा' आहेत. त्यांच्या इतक्या पटकथा लिहिलेला माणूस मराठींतच नव्हे तर माझ्या मतें भारतीय चित्रपट सृष्टींतही आढळणार नाहीं. पटकथा-संवाद-गीतें प्रमुख भूमिका इत्यादि विक्रमही माडगुळकरांनीं केले आहेत. चित्रपटांतली गाणीं कांहीं 'विक्रम' करूं शकतात हेंही माडगुळकरांनीं सिद्ध केलें आहे. माडगुळकर हे केवळ गीतकार नाहींत तर चांगले कवि आहेत. 'जोगिया' ह्या संग्रहांतल्या **'जोगिया' नको थांबवूं इथेंच दिंडी, आसरा, नवकाव्य, चंदनाचा सन्मान, भास** ह्यासारख्या कविता व अमृत वृक्ष व व्याध ह्या संगीतिका वाचल्या कीं ह्याचा प्रत्यय येतो.

कथाकार माडगुळकर हें त्यानंतर आलेले बिरुद ! धाकटचा माडगुळकरांनीं कथाक्षेत्रीं बहुत विक्रम केल्यानंतर थोरले माडगुळकर बसले कथा लिहायला आणि तेथेंही त्यांनी "हम भी कुछ कम नहीं हैं" हें सिद्ध करून दाखविलें आहे. **थोरली पाती** ह्या त्यांच्या कथा-संग्रहांतल्या **सिनेमांतला माणूस, अरे, दिवा लावा कुणींतरी, नागूदेव, वेडा पारिजात, अतर्क्य, माणूस अखेर माणूस** आहे ह्या कथांनीं माडगुळकरांना मोठें यश मिळवून दिलें आहे.

माडगुळकर ह्या माणसांत आणखीही एक मोठा पैलू आहे–तो नकलाकाराचा ! माडगुळकरांनीं खूप माणसें पाहिलीं आहेत आणि मनांत सांठवून ठेवलीं आहेत. अभिनेता माडगुळकर, कथा निवेदक माडगुळकर, काव्य वाचक-माडगुळकर, वक्ते माडगुळकर हीं आणखीं कांहीं वलस्थानें ! रसरशित मराठी पिंडाचा हा माणूस आतां गोमंतक मराठी साहित्य संमेलनाचा अध्यक्ष झाला आहे. त्यांच्या तपस्येचा सत्कार होत आहे. तो सत्कार यथोचित नाहीं काय ? आम्हीं 'माडगुळकरांचें' अभिनंदन करतो. ☆ ☆

## तुम गीतन का भाव

**भारतीय** संगीतांतील एक "कोठीवाले" गायक व नायक, आदर्श संगीतशिक्षक, सहृदय कवि पं. जगन्नाथबुवा पुरोहित यांचा षष्ठ्यब्दिपूर्ती सत्कार समारंभ "न भूतो" अशा थाटामाटांत फेब्रुवारी महिन्यांत साजरा झाला हें उचितच झालें.

ललाट व हातावरील रेषांवर अवलंबून न रहातां, गुरुजनांची अजोड सेवा, अपार परिश्रम, विलक्षण जिद्द ह्यायोगें, एखाद्या कर्मयोग्याच्या निष्ठेनें अनेक गवयांकडून अत्यंत कुशाग्र बुद्धीनें बुवांनी संगीतविद्या संपादन केली आणि "अपना हाथ जगन्नाथ" ही म्हण खरी करून दाखविली. अथांग ज्ञान, सखोल व्यासंग, पुरोगामी अभिरुचि ह्यांच्या बळावर ते गायन-जगतांतील जगन्नाथ झाले व त्या क्षेत्रांत त्यांनी भरघोस पौरोहित्य केले !

बुवांनीं जिवापाड कष्ट करून ठिकठिकाणाहून ढंगदार दुर्मिळ चिजा पैदा केल्या व त्यामध्यें काव्यगुणानें नटलेल्या, बांधेसूद बंदिशीच्या स्वरचित सुंदर चिजांची भर घालून समृद्ध भांडार तयार केले. परंतु बुवांनीं प्राणापलिकडे जतन करून ठेवलेली शुद्ध स्वरांची, तालबद्ध आणि आजच्या जगांत अनवट वाटण्याजोगी अमोलिक चीज म्हणजे अकृत्रिम सहृदयतेची माणुसकी ! म्हणूनच त्यांनी विद्या संपादन करतांना जसे अपार कष्ट घेतले त्याचप्रमाणें विद्यादान करतांना पराकोटीचं औदार्य दाखवलं. "फोडिले भांडार" ह्या वृत्तीनें संगीत विद्येचं दान करणारी माणसं ही संगीतकलेची चालती बोलती विद्यापीठं असतात. या विद्यापीठांत छापील अभ्यासक्रम

नसतो, परिक्षा नसतात, पदव्या नसतात. त्यांची तालीम हीच पाठ्यपुस्तकं, शिष्यांनी गाजविलेल्या मैफली याच परिक्षा आणि रसिकांनी केलेला गौरव हाच डिप्लोमा ! महाराष्ट्रांत संगीताचं वैभव टिकवलं ते अशाच चालत्या बोलत्या विद्यापीठांनी. नुसते कानसेन निर्माण केल्याचा अभिमान न वाळगतां संगीताच्या वैभवाची परंपरा टिकवणारे तानसेन निर्माण केले ते याच विद्यापीठांनी ! अशा या विद्यापीठांत "विद्या विनयाने शोभते नि दानानें विकसते" हे ब्रीदवाक्य धारण करणाऱ्या "गुणीदास विद्यापीठा"ला मानाचं स्थान नक्कीच आहे.

आपल्या स्नेहार्द अंतःकरणामुळें बुवांनी खूप माणसें जोडली. "गुनिजन सब होत नाहीं, गुन की चर्चा नाहीं, सेवा गुनियन की कीजे" ही पंक्ति त्यांनी "मारव्या" तील स्वरचित काव्यांत उतरवली नाहीं, तर जिथं जिथं गुण टिपला तिथं तिथं "गाऊं गुनन कैसे तुमरो" अशा निर्लेप वृत्तीनें आचरणांत आणली. ते खरोखरीच "गुणांचे दास" असल्यामुळें संगीत क्षेत्रांतील वेगवेगळ्या थरांत सारखेच लोकप्रिय झाले व नितांत गुरुभक्ति व शिष्यांवरचे अपार प्रेम ह्यांचा मनोज्ञ समन्वय त्यांच्यामध्यें झाला. त्यांना संगीताची संथा देणारे पै. खाँसाहेब विलायत हुसेन खाँ "प्राणपिया" ह्यांनी प्रसन्न होऊन दिलेला "जगमें प्रभू तोहे देत वडो नाम" हा आशिर्वाद व त्यांच्या एका शिष्यानें व्यक्त केलेला "सूरन में रस तुम हो, तालनमें लय गुनीदास, गीतनका भाव तुम हो" हा आदरभाव ह्यामागील इंगित झालें तरी हेंच ! अकृत्रिम भावनाशील स्वभावामुळें सत्कार समारंभांत गातांना बुवांनीं "मारुवसंत" ही नवी निर्मिति भारावलेल्या अंतःकरणानें सादर केली. प्रथमतःच "आजको शुभदिन गुनिदासको नाहीं, ये है प्राणपियाको काज आज" अशी आदरयुक्त विनीतभावानें त्यांनी रसिकांना साद घातली. नंतर "संगीत अगाध जैसो तुमरो प्रेम अगाध, या कारन गुनिदास करत नित प्रणाम, लेहो तुम सब नर नारी" अशा भावस्पर्शी शब्दांत रसिकांच्या प्रेमाला दाद दिली. असल्या ह्या निर्दंभ प्रेमामुळें "गुणीदासां" विषयीं विचार करतांना "बरनीन जायें मोसे गुन तुमरो" अशी त्यांच्या शिष्यांची व चाहत्यांची अवस्था झाल्यास नवल नाहीं.

"जोगकंस" "स्वानंदी" आदि नवीन रागिणींच्या शिल्पकाराच्या भावी आयुष्यांत "जियरा मानस नाहीं" असं म्हणण्याचा दारुण प्रसंग न येतां "जुग जुग जिये तू निसदिन पावे सुखवा" असा सुरेल अनुभव येऊन सदैव "मधुश्री" फुलावी व "सूरज चंदा जब तक फिरे, सवन तोरे नाम सुमीरन करे" अशी लोकोत्तर व्यक्ति होण्याचं भाग्य त्यांना लाभावं हीच त्यांच्या षष्ठ्यब्दीपूर्ती निमित्त प्रभूचरणीं वाहिलेली हार्दिक दूर्वा आणि फुलें....

**—आदित्य**

---

**( पान ५८ वरून )**

रामशास्त्र्याची निस्पृहता हा त्याचा बाणा असतो. बाबूराव ठाकूर ह्यांची वृत्तपत्रीय कारकीर्द ह्या अनेक गुणांचा प्रत्यय देणारी आहे आणि म्हणून त्यांच्या भाषणाविषयीं कुतुहल होतें. आणि त्यांच्या अध्यक्षीय भाषणानें ती कुतुहलपूर्ती होते. बेळगांवची जखम वाहती असल्यानें त्याचा परिस्फोट ठाकूरांच्या भाषणांत व्हावा हें स्वाभाविक आहे. त्यादृष्टीनें त्यांनीं व्यक्त केलेले विचार महत्त्वाचे आहेत. **"दिल्लीला फक्त हिंसेचीच भाषा समजते असा मसज जनतेंत रूढ होणें हें अनिष्ट आहे."** असा इषारा त्यांनीं मद्रासमधील घटनांचे पार्श्वभूमीवर दिला. दक्षिणेंतल्या ह्या घटनांबाबत जें सरकारी धोरण व्यक्त झालें तें मोठें संभ्रमांत पाडणारे आहे. शांततामय चळवळ बेळगांव-कारवारनें केली. पण नऊ वर्षें होऊनहि सरकारनें त्याची दखल घेतली नसल्याबद्दल त्यांनीं तक्रार नोंदविली. गोव्याच्या जनतेनेंही आपलें मत निःसंदिग्धपणें व्यक्त केलें असूनही त्याचीही दखल घेतली न गेल्याबद्दल खंत व्यक्त करून ठाकूर म्हणतात **"लोकशाहींत असें कां घडावें, हें मोठें आश्चर्य आहे. केंद्र सरकारची नीति अगम्य आहे. नुसते प्रश्न निर्माण करावयाचे. त्यांचीं गुंतागुंत वाढवायची आणि प्रश्न किचकट झाले कीं ते टांगून ठेवायचे ! विघटनेची, दुहीचीं बीजें खुद्द केंद्र सरकारच पेरीत आहे; आणि त्यांतून एकात्मतेच्या फळाची अपेक्षा करीत आहे त्यामुळें सरकार कोणाचे व कोणते हित साधूं पहात आहे न कळे.** ह्या साऱ्या पार्श्वभूमीवर देशाच्या भवितव्याबाबतची चिंता त्यांनीं तळमळीनें व्यक्त केली आहे. **"वृत्तपत्रकार हा दीपग्रहाप्रमाणें मार्गदर्शक असला पाहिजे."** असें सांगून त्यांनीं पत्रकारांच्या कर्तव्याची चर्चा केली आहे. "ब्रिटीश राजवटींत वृत्तपत्रांचा शासनाला दरारा वाटत असे आज मात्र अधिकारी व राज्यकर्ते बेपर्वा झालेले आहेत." अशी खंतही ते व्यक्त करतांना दिसतात. ह्या व्यक्त करूनहीं अखेर त्यांनीं भारतीय एकात्मतेची कधीं नव्हती अशी आज निकड असल्याचें सांगून पत्रकारांनीं त्यासाठीं सदैव जागरूक राहाण्याची गरज आहे असें प्रतिपादन केलें. ठाकूर ह्यांच्या वृत्तपत्रीय कारकीर्दीचे सर्व विशेष त्यांच्या भाषणांत आलेले आहेत. त्यांचा समतोल, सडेतोडपणा, तळमळ, व्यापक बैठक, हे गुण त्यांत आहेत. त्यांत केवळ शासनाला शिव्या देऊन तृप्ति मानण्याची प्रवृत्ति नाहीं. कांहीं विधायक वृत्ति दिसते. इषाऱ्यांत तळमळ व व्यापक देशहिताची दृष्टि दिसते. बेळगांव, कारवारची वेदना जाणवते. महाराष्ट्राची चळवळ मराठा व आचार्य अत्रे ह्यांनी जिवंत ठेवली व तडीस नेली. ठाकूर व तरुण भारत ह्यांनीं सीमाप्रश्नाचे बाबत नेमकी तीच कामगिरी केली आहे. प्रश्न अजून सुटलेला नाहीं. पण कर्मयोग्यांची तपश्चर्या कधीं वांया जात नाहीं. ठाकूरांचा कर्मयोगही असाच यशस्वी होईल अशी आपण आशा करूं या !

**— सारस्वत**













## राजकारण

### केरळचें "दुखणें"

**विश्वास** ठेवा अगर ठेवूं नका. पण केरळचें दुखणें आतां 'क्रॉनिक" झालें आहे. दुखण्याच्या वेगवेगळया 'स्टेजेस' असतात बघा ! पेशंट निष्काळजी असला कीं, एखादें साधें दुखणें सुद्धां 'क्रॉनिक' होऊन बसते. आणि तसें तें एकदां झालें कीं, मग एम्. डी. वा एफ्. आर्. सी. एस् डॉक्टर जरी आणला तरी तो नाडी पाहून, पोट तपासून एक्स-रे काढून फार तर त्या पेशंटचें जीवन आणि त्याचा मृत्यु यांतील अंतर सूचित करील. त्याला बरें करणें "ह्या जन्मीं होणें नाहीं" असें तो स्वच्छ सांगून टाकील. केरळ हा एक भारतीय गण-राज्यांतील एक प्रांत आहे. इतर सर्व ठिकाणीं शांततापूर्ण निवडणुका होतात. आणि मंत्रिमंडळें निर्माण होतात. राज्य-कारभार सुरूं होतो आणि सुरळीतपणें चालतोही. केरळमध्यें मात्र निवडणुका होतात. पण स्थिर राज्य मात्र तेथल्या जनतेला मिळत नाहीं. तेथें पुन्हां पुन्हां अस्थिरता उत्पन्न होते. पुन्हां राष्ट्रपति पुढें सरसावतात व त्यांना प्रतिनिधी नेमून राज्यशकट हांकावा लागतो. केरळमधील निवडणुका होण्यापूर्वीं एक फार महत्वपूर्ण घटना घडली. ती म्हणजे चीनवादी कम्युनिस्टांची सार्वत्रिक धरपकड ! चीनवाद्यांची धरपकड ही केरळच्या निवडणुका डोळयां-पुढें ठेवून करण्यांत आली आहे. हा लोकशाहीचा खून आहे. कांग्रेसला वांचविण्या-साठीं हा भ्याडपणाचा मार्ग शासनानें स्वीकारला आहे अशा तऱ्हेचे अनेकविध आरोप श्री. नंदा व शास्त्रीजी यांजवर करण्यांत आले. "निवडणुकीसाठीं स्थान-बद्धांना सोडा" म्हणून मागणी झाली. पण शासन ह्यापैकीं कशानेंच ढळलें नाहीं. अखेर निवडणुका झाल्या आणि चीनवादी कम्युनिस्टांचा गट मोठया संख्येने निवडून आला. कांग्रेसची फाटाफूट झाल्यानें त्यांचें यश विभागलें गेलें. संयुक्त समाजवाद्यांना (संयुक्त असल्यामुळेंच कदाचित) १३ जागा मिळाल्या. मुस्लिम लीग व लीग स्वतंत्र म्हणून ११ माणसें निवडून आलीं. आणि केरळचे पहिले कम्युनिस्ट मुख्यमंत्री नंबुद्रीपाद राजभवनाच्या वाऱ्या करूं लागले. ४० ही संख्या मोठी असल्यानें मंत्रिमंडळ देण्याचा अधिकार फक्त आप-ल्याच पक्षाला आहे असा त्यांचा दावा आहे. पण १३३ पैकीं फक्त ४० असा हिशोब त्यांच्या घ्यानीं आलेला दिसत नाहीं. प्रश्न स्थिर सरकार देण्यासंबंधीचा आहे. कांग्रेसनें आपण आदर्श विरोधी पक्ष कसा हें दाखविणार म्हणून प्रतिज्ञा करून टाकली आहे. केरळ कांग्रेस (रिबेल कांग्रेस) नें आपल्या मातृसंस्थेला सहकार्य देण्याची तयारी दाखविली होती. कदाचित कांग्रेस, केरळ कांग्रेस मिळून स्थिर सरकार लाभलें असतें. कारण मुस्लिम लीगशी केरळ कांग्रेसचा करार झालेला होता. परंतु "तत्वनिष्ठा" (वा अहंकार म्हणा) आडवी आली. आणि "आम्हीं नाहीं जा." म्हणून कांग्रेस बाजूला झाली. त्या नंतरची नाटय-पूर्ण घटना म्हणजे कम्युनिस्ट स्थानबद्धां-बद्दलचे सर्व अधिकार केंद्राकडे सोंपविले गेले. लोकसभेंत व अन्यत्र "डाव्यांना सोडा" म्हणून मागणी करण्यांत आली. परंतु गृहमंत्री नंदांनीं त्या मागणीला ठाम नकार दिला व डाव्यांच्या काळया कृत्यांची यादी जनतेला सादर केली. 'तरीही पण त्यांना सोडाच' ही मागणी कम्युनिस्ट करतातच (त्यांत नवल नाहीं) पण लोहिया, मधु लिमये, एस्. एम्. जोशां-सारखीं माणसेंही करताहेत. लोकशाहीचा हवाला देऊन करताहेत. पण कम्युनिस्ट हे अगदीं (जगांतले सुद्धां) कधीं लोकशाही-निष्ठ नसतात हें स्वच्छ सत्य ते नजरेआड करतात. आज कम्युनिस्टांनी केरळांत लोकशाही माध्यम स्वीकारलें असलें तरी चिनी पैसा त्यांनीं भरपूर वापरला आहे असा स्पष्ट आरोप त्यांच्यावर आहे. नंबुद्रीपादांना एक लाखाची जी थैली देण्यांत आली तिचे 'दाते' कोण आहेत ह्याची यादी प्रसिद्ध करण्याचें आवाहन केलें गेलें. पण महिने लोटून गेले तरी ही यादी 'तयार' करण्याचे काम अजून पूर्ण झालेलें नाहीं. स्थिर शासन हवें ही गोष्ट खरी असली तरी आज केरळांत कोणताही एक पक्ष तें देऊं शकणार नाहीं. सं. सो. पक्षानें डाव्यांना सहकार्य देऊं केलें आहे. त्यांत "कांग्रेस नको" ही लोहिया-लिमये यांची भूमिकाच अधिक महत्वाची ठरलेली दिसते. केरळ कांग्रेस-कांग्रेस ही युति फक्त खरेंखुरें स्थिर राज्य देऊं शकली असती. पण जनकल्याणाच्या प्रतिज्ञेपेक्षां पक्षीय अहंकार जेव्हां मोठे ठरतात तेव्हां जें कांहीं होते तेंच घडलें आहे. अजूनही हा प्रश्न सुटलेला नाहीं. कम्युनिस्टांचा प्रयत्न फार जारी आहे. पण ना. नंदाजींचा निर्धार त्यांच्या मार्गांत उभा आहे. आतां ही मंडळी राष्ट्रपतींची भेट घेणार आहेत. डाव्या कम्युनिस्ट पक्षाचें शासन आलें तरी त्याचें आयुष्य अल्प राहील ही एक काळया दगडावरची रेघ आहे. तें होऊं न देण्यांतच खरा राष्ट्र-वादी शक्तींचा विजय आहे. त्या दृष्टीनें बाकीच्या साऱ्याच पक्षांनीं विचार करणें अगत्याचें आहे. अन्यथा राष्ट्रपतींची राजवट आज तरी केरळांत अटळ दिसते. हें सुचिन्ह नव्हे. राज्यशासन शक्य असूनही हट्टाग्रहानें तें न देणें हें लोकशाहींत बसतें असें वाटत नाहीं. आदर्श विरोधी पक्ष देण्यापेक्षां आदर्श राज्य देणें ही केरळची आजची गरज आहे. आणि म्हणून कांग्रेसनें आपल्यांतल्याच रुसलेल्यांना जवळ करावें आणि स्थिर राज्य द्यावें असें वाटतें.

एक महत्वाचा व चिंतेचा विचार 'चीनवादी कम्युनिस्ट' हे चीनवादी असून (आणि म्हणूनही) मोठया संख्येनें तेथें निवडून येऊं शकतात—विशेषत: चीनी आक्रमणाच्या पार्श्वभूमीवर हें मोठया प्रमाणांत केरळांत घडते ही घटना सामान्य नाहीं. पोटांत अल्सरसारखें दुखणें कायम ठेवून 'प्रकृति'सुधारणार नाहीं. विशेषत: बाह्य 'साथीं' (चीन—पाकिस्तानसारख्या) चा सुळसुळाट चालूं असतांना अंतर्गत प्रकृति निकोप राखणें हें कर्तव्य ठरतें. रोग वैद्य-हकीमांकरवीं हटत नसेल तर सर्जनला पाचारण करणें 'धर्म्य' ठरतें. ऑपरेशन आवश्यक ठरते. ना. नंदांनीं ही वस्तुस्थिति नुकतीच सूचित केली आहे. ती बोलकी नाहीं असें कोण म्हणेल ?

☆ ☆








## मी तो एक यात्रिक !

**मी** एक यात्रिक आहे. मन उद्विग्न झालं आहे. खूप दिवस सरकारी भत्ता खाऊन राजासारखा स्थानबद्ध होतो. गाद्या गिरद्यावर लोळून लोळून आणि श्रीमंती खुराक खाऊन खाऊन न अंग कसं अगदीं आंबून गेलं आहे. त्यांतल्या त्यांत माझा एक सखा-सन्मित्रही मला सोडून गेला आहे. त्याच्या बिऱ्हाडीं जीं नवीन माणसें आलीं आहेत– तीं दिसायला चांगलीं गोरी गोमटीं वरीं वाटलीं. पण कांहीं खरं नाहीं. शेवटीं मला कंटाळा आला. वाटलं जावं कुठें तरी यात्रेला ! शेवटीं बरोबर दोन चार पांच सहकारी घेतले आणि निघालो यात्रेला– हाजच्या ! सरकार दरबारीं तसा मी 'वजन' ठेवून असल्यानें पास परवानग्या मिळाल्या आणि मी निघालो. आतां मनुष्य प्रवासाला निघाला म्हणजे मार्गावरचीं गांवें त्याला दिसतातच. नाहीं कां ? एखादें गांव वरें वाटते. मग तिथें आपण उतरतो. दोन चार दिवस मौज मजा करतो. तसाच मी कुठें कुठें उतरलो. नुकताच मी कैरो गांवीं गेलों होतो. छान गांव आहे. माणसें मोठीं चांगली. खरं म्हणजे मी होतो यात्रेकरू. मला अगदीं झोंपडींत वा धर्मशाळेंत रहायचं होतें. पण त्यांनीं मुळीं ऐकलंच नाहीं ! मला घेऊन गेले बादशाही हॉटेलांत. पाहुणा पडलो मी ! नकार तरी कसा देणार ?––

हें सारें मी कुणासंबंधीं लिहिलें आहे हें आपण सारे जण सहज समजूं शकाल. काश्मीरचे माजी पंतप्रधान, पंडितजींचे एके काळचे खास दोस्त शेख अब्दुल्ला हे तूर्त हाजच्या यात्रेला गेलेले आहेत.

त्यांनीं नम्रपणें मागणी केली–"यात्रेसाठीं परवानगी द्या." आपल्या राज्यशासनाला वाटलें–"जाऊं द्या बिचाऱ्यांना. तेवढेंच पुण्य पदरीं पडेल" पण धार्मिक हाजची ती यात्रा नाहीं वा मुळांतच नव्हती हें आतां स्पष्ट झालें आहे. शेख अब्दुल्ला यांचें आतां नेमकें स्थान काय आहे हें एक मला नेहमीं कोडेंच वाटत आलें आहे. सरकारी परवानगीनें सरकारी बदनामी करण्यासाठीं हा परदेशी वकील आपण पाठविला आहे काय ? इंग्लंडमध्यें म्हणून त्यासाठीं एक मोटर राखून ठेवण्यांत आली आहे काय ? त्यांनीं अरब राष्ट्र प्रमुख नासेर ह्यांच्याशीं बोलणें झाल्यानंतर जी मुलाखत दिली. त्या नंतरही अजून त्यांचें सरकारी कोडकौतुक ह्या देशाच्या पैशानेंच होत राहणार आहे काय ? स्वतःची बदनामी करून घेण्यासाठीं हा 'धार्मिक' यात्रेकरू आम्ही पाठविला आहे काय ? परवां लंडनमध्यें त्यानें चक्क पाकिस्तानच्या सैन्यें न काढून घेण्याच्या भूमिकेला पाठिंवा दिला, आणि आमची भूमिका चूक आहे म्हणून सांगितलें. आणि हें सारें आमचें इतमाम भोगत भोगत सांगितलें. शेख साहेबांची भूमिका हाजची परवानगी देण्यापूर्वी राज्यशासनाला ठाऊक नव्हती काय ? त्यांचे 'काश्मिरी' उपद्व्याप सरकारच्या कानीं आले नव्हते काय ? नासेरचे आणि नेहरूंचे संबंध चांगले होते हें ध्यानीं घेऊनच अब्दुल्ला हे मुद्दाम नासेरकडे गेले कीं नाहीं ? त्याचें कान त्यांनीं भरले कीं नाहीं ? लंडनमध्यें आमच्याच सरकारी गाडींत बसून त्यांनीं आमच्याच नेतृत्वाला जायबंदी करणारे Rash Driving केलें कीं नाहीं ? हाजच्या यात्रेचा आणि ह्या विध्वंसक प्रचाराचा कांहीं संबंध आहे काय ? परदेशी जाण्याचे परवाने देतांना हेतु संशोधन होत असते ना ? मग तसें तें शेख साहेबांच्याबद्दल झालें होतें कीं नाहीं ? असल्यास त्यांत काय आढळून आले ? यात्रेसाठीं कांहीं अटी घालण्यांत आल्या होत्या काय ? त्यांनीं पाळल्या कीं नाहींत हें बघितलें जातें आहे काय ? आणि त्यांच्या योजनेसाठीं भारतीय इतमाम दिला जातो आहे तो काय म्हणून ? त्यांचे नेमकें स्थान कोणते ? अजूनही ते काश्मीरचे अनभिषिक्त पंतप्रधान आहेत अशीच सरकारी धारणा आहे काय ? त्यांनीं सुटल्यावर केलेल्या साऱ्या चाळ्यांना हा सरकारी मुक्त परवाना आहे असाच ह्याचा अर्थ आहे काय ? ह्या साऱ्यांतून आपण हास्यास्पद ठरतो व काश्मीरविषयक सर्व प्रयत्नांवर व युनोंतील वक्तव्यांवर पाणी पडतें हें सरकारच्या ध्यानांत येत नाहीं काय ? देशभक्तांना बंदी आणि देशबंधूंना चंदी हा काय प्रकार आहे ? या विषयीं कांहीं ठाम अशीं उत्तरें मिळायला हवीं आहेत. अन्यथा मांजरी जशी आपलींच पिल्लें खाऊन टाकते तसेंच राज्यशासन आपलेच निर्णय खाऊन टाकते आहे असा समज सर्वत्र दृढ होण्याची शक्यता आहे. एकीकडे काश्मीरचें सामिलीकरण वज्रलेप करण्याचे दृष्टीनें पावलें पडत आहेत तर दुसरीकडे ती बाजू किती लंगडी आहे हें सिद्ध करणाऱ्या प्रयत्नांना सरकारी आशिर्वाद लाभत आहे ह्यांतील विसंगति विदारक आहे. हास्यास्पद करणारी आहे. चिंत्य आहे.

☆ ☆

## सत्यं, शिवं, सुंदरम्

### जनतेच्या भावनेला "दाद" द्या

**जळगांवला** मराठी पत्रकार परिषद भरली. तशी ती दरवर्षीच भरते आणि संपतेही. पण ह्या सभासंमेलनांचेंही एक विशिष्ट कार्य असते. वार्षिक मेळावा ही भूमिका असतेच. परंतु केवळ तेवढीच भूमिका असत नाहीं. वृत्तपत्रें हीं राज्यशासन व जनता ह्यांतील एक प्रभावी दुवा आहे असें मानलें जातें. जनतेचा आवाज सचिवालयापर्यंत तें पोहोंचवितें आणि सचिवालयांतले विचार झोंपडीपर्यंत पोहोंचविण्याचे कार्यही तें करतें. आणि म्हणून जागृत लोकशाहींत वृत्तपत्रांना निर्विवाद महत्वाचें स्थान दिलें जातें. जळगांवच्या पत्रकार परिषदेचें उद्घाटन श्रीमति इंदिरा गांधी ह्यांनीं केलें. त्यांत त्यांनीं तरुणांच्या मनांवर अनिष्ठ परिणाम करणारें लेखन करणाऱ्या वृत्तपत्रांना इशारा दिला व शासकीय बडगा उगारण्याची वेळ आणली जाऊं नये म्हणून सुचविलें. त्यासाठीं पत्रकार परिषदेनें कांहीं योजना तयार करावी असेंही त्यांनीं सुचविलें. स्वागताध्यक्ष श्री. ब्रिजलाल पाटील ह्यांनीं आपल्या भाषणांत "सत्यान्वेष हा मुद्रण स्वातंत्र्याचा पाया आहे" असें सांगून "अशा सत्यान्वेषणासाठीं" कुठल्याही प्रकारें खोट्या प्रतिष्ठेचा तथाकथित सार्वजनिक सुरक्षितेचा आडपडदा निर्माण न करतां पडद्या आडच्या फसव्या चौकशीचा फार्स निर्माण करून आजच्या शासनानें एक प्रकारें भारतीय घटनेलाच घायाळ केलें आहे. ही अनिष्ठ प्रथा ताबडतोब बंद करून खऱ्या लोकशाही मार्गानें पावलें टाकावींत" असें शासनाला त्यांनीं आवाहन केलें. अध्यक्ष होते बेळगांवच्या "तरुण भारत" ह्या झुंजार वृत्तपत्राचे संपादक श्री. बाबूराव ठाकूर ! ठाकूर ह्यांची वृत्तपत्रसेवा केवळ वयानें मोठी नाहीं. तर गुणांनीहीं ती मोठी आहे. वृत्तपत्रकाराची भूमिका जागल्याची असते. तो जनसामान्याचा मित्र असतो. मार्गदर्शक असतो. त्याला जगांतल्या प्रत्येक संघटनेचा अन्वयार्थ समजून घ्यायचा असतो आणि तो वाचकाला विशद करून सांगायचा असतो. ग्रहपूर्वग्रहांनी मलिन झालेली दृष्टि त्याला उपयुक्त ठरत नाहीं. बुद्धीचा समतोल ही त्याची शक्ति असते. आणि

(पान ५६ पहा)






अनुक्रमणिका

